॥श्रीहरि:॥

# अमृत-बिन्दु

## ( शिक्षासाहस्त्री )

## ( १ ) अविनाशी सुख

आपल्यासाठी सुख इच्छिल्याने नाशवान् सुख मिळते आणि दुसऱ्यांना सुख पोहचविल्याने अविनाशी सुख मिळते. ॥ १ ॥

सुख भोगण्यासाठी स्वर्ग आहे तसेच दु:ख भोगण्यासाठी नरक आहे आणि सुख-दु:खातून उपराम होऊन महान आनंद प्राप्त करण्यासाठी हा मनुष्यलोक आहे. ॥ २ ॥

संसाराच्या संबंध-विच्छेदाने जे सुख मिळते, ते संसाराच्या संबंधाने कधी मिळूच शकत नाही. ॥ ३ ॥

जोपर्यंत नाशवान सुख घेत रहाल, तोपर्यंत अविनाशी सुखाची प्राप्ती होणार नाही. ॥ ४ ॥

भोगांचे नाशवान् सुख तर नीरसतेत परिणत होते आणि त्याचा अंत होतो. परंतु परमात्म्याचे अविनाशी सुख सरस राहते आणि वाढतच राहते. ॥ ५ ॥

## ( २ ) अभिमान

चांगलेपणाचा अभिमान वाईटपणाचे मूल आहे. ॥ ६ ॥

स्वार्थ आणि अभिमानाचा त्याग करण्याने साधुता येते. ॥ ७ ॥

स्वत:च्या बुद्धीचा अभिमान हाच शास्त्र वचन आणि संत वचन यांना अंत:करणात टिकू देत नाही. ॥ ८ ॥

वर्ण, आश्रम इत्यादींची जी विशेषता आहे, ती दुसऱ्यांची सेवा करण्यासाठी आहे, अभिमान करण्यासाठी नाही. ॥ ९ ॥

॥श्रीहरि:॥

# विषय-सूची

## (वर्णानुक्रमानुसार)

तुम्ही स्वतःच्या चांगलेपणाचा जितका अभिमान कराल, तितकाच वाईटपणा उत्पन्न होईल. म्हणून चांगले व्हा. परंतु चांगलेपणाचा अभिमान करू नका. ॥ १० ॥

ज्ञान मुक्त करते. परंतु ज्ञानाचा अभिमान नरकात नेतो. ॥ ११ ॥

सांसारिक वस्तूच्या प्राप्तीत तर अभिमान येऊ शकतो. परंतु भगवत्प्राप्ती झाल्यावर अभिमान येऊच शकत नाही. उलट अभिमानाचा सर्वथा नाश होतो. ॥ १२ ॥

स्वार्थ आणि अभिमानाचा त्याग केल्याविना मनुष्य श्रेष्ठ होऊ शकत नाही. ॥ १३ ॥

जेथे जातीचा अभिमान असतो, तेथे भक्ती होणे फार कठीण आहे. कारण भक्ती स्वयंद्वारा होते, शरीराद्वारा होत नाही. परंतु जात शरीराची असते, स्वयंची नव्हे. ॥ १४ ॥

जोपर्यंत स्वार्थ आणि अभिमान आहे, तोपर्यंत कोणाबरोबरही प्रेम होऊ शकत नाही. ॥ १५ ॥

अभिमानी मनुष्य सेवा तर कमी करतो. परंतु त्याला मी फार सेवा केली असे वाटते. निरभिमानी मनुष्य सेवा तर खूप करतो. परंतु त्याला मी फार कमी सेवा केली असे वाटते. ॥ १६ ॥

बुद्धिमानाचा अभिमान मूर्खतेतून उत्पन्न होतो. ॥ १७ ॥

जी वस्तु आपली आहे, तिचा अभिमान होत नाही आणि जी वस्तू आपली नाही, तिचाही अभिमान होत नाही. अभिमान त्या वस्तूचा होतो, जी आपली नाही, परंतु तिला आपले मानले आहे. ॥ १८ ॥

जितके जाणतो, त्यालाच पूर्ण मानून जाणण्याचा अभिमान करण्याने मनुष्य 'नास्तिक' होतो. जितके जाणतो, त्यात संतोष न

केल्याने तसेच जाणण्याचा अभाव खटकल्याने मनुष्य 'जिज्ञासू' बनतो. ॥ १९ ॥

ज्या सांप्रदायांमध्ये, मतां मध्ये, सिद्धान्तामध्ये, ग्रंथामध्ये, व्यक्तींमध्ये स्वत:चा स्वार्थ आणि अभिमान यांच्या त्यागाची मुख्यता राहते, ते महान् श्रेष्ठ असतात. परंतु ज्यांच्यात स्वार्थ आणि अभिमान यांची मुख्यता राहते, ते महान् निकृष्ट असतात. ॥ २० ॥

## ( ३ ) अहंता ( मी-पणा )

मी-पणा हाच सर्व संसाराचे बीज आहे. ॥ २१ ॥

शरीराला मी व माझे मानल्याने अनेक प्रकारची अनंत दु:खे भोगावी लागतात. ॥ २२ ॥

एका अहम्च्या त्यागाने अनंत सृष्टीचा त्याग होतो. कारण अहम्नेच संपूर्ण जगताला धारण केले आहे. ॥ २३ ॥

'मी बंधनात आहे'—यात जो 'मी' आहे, तोच 'मी मुक्त आहे' अथवा 'मी ब्रह्म आहे' यातही आहे! या 'मी' चे (अहम्चे) नाहीसे होणे हीच वास्तविक मुक्ती आहे. ॥ २४ ॥

जगत् जीव आणि परमात्मा—हे तिन्ही एकच आहेत. परंतु अहंतेमुळे हे तीन दिसतात. ॥ २५ ॥

वास्तविक असंगता शरीरापासूनचा झाली पाहिजे. समाजापासून असंगता झाल्यास अहंता (व्यक्तित्व) नाहीशी होत नाही, तर दृढ होते. ॥ २६ ॥

आपले स्वरूप चिन्मय सत्तामात्र आहे आणि त्यात अहम् नाही—ही गोष्ट जर समजली तर त्याच क्षणी जीवन्मुक्ती आहे. ॥ २७ ॥

संघर्ष जाती अथवा धर्म ह्यांच्या अनुषंगाने होत नाही, तर

अहंकाराने उत्पन्न होणाऱ्या स्वार्थ आणि अभिमान ह्यांच्या अनुषंगाने होतो. ॥ २८ ॥

आपल्यात विशेषता पाहणे अहंता, परिच्छिन्नता, देहाभिमान यांना पुष्ट करते. ॥ २९ ॥

भगवंतापासून उत्पन्न झालेली सृष्टी भगवद्रूपच आहे. परंतु जीव अहंता, आसक्ती, मोह या विकारामुळे तिला जगद्रूप बनवितो. ॥ ३० ॥

## (४) उद्देश

ज्याच्यासाठी मनुष्यजन्म मिळाला आहे, त्या परमात्मप्राप्तीचाच उद्देश झाल्यास मनुष्याला सांसारिक सिद्धी-असिद्धी बाधा करू शकत नाहीत. ॥ ३१ ॥

जसे रोग्याचा उद्देश निरोगी होण्याचा असतो, तसेच मनुष्याचा उद्देश स्वतःचे कल्याण करण्याचा असला पाहिजे. सांसारिक सिद्धी-असिद्धी यांना महत्त्व न दिल्याने अर्थात् त्यात सम राहिल्यानेच उद्देशाची सिद्धी होते. ॥ ३२ ॥

जेव्हा साधकाचा उद्देश केवळ परमात्मप्राप्तीचा होतो, तेव्हा त्याच्याजवळ जी काही सामुग्री (वस्तू-परिस्थिती इत्यादी) असते, ती सर्व साधनरूप (साधन-सामुग्री) होते. ॥ ३३ ॥

एका परमात्मप्राप्तीचा उद्देश दृढ झाल्यास अंतःकरणाची जितकी शीघ्र आणि शुद्धी होते, तितकी शीघ्र आणि तशी शुद्धी दुसऱ्या कोणत्या अनुष्ठानाने होत नाही. ॥ ३४ ॥

इन्द्रियांद्वारा भोग तर पशूही भोगतात, परंतु ते भोग भोगणे हा मनुष्य-जीवनाचा उद्देश नाही. मनुष्य-जीवनाचा उद्देश तर सुख-दुखापासून रहित असलेले तत्त्व प्राप्त करणे आहे. ॥ ३५ ॥

कर्मयोग, ज्ञानयोग, ध्यानयोग, भक्तियोग इत्यादी सर्व साधनात उद्देशाच्या एका दृढ निश्चयाची फार मोठी आवश्यकता आहे. जर स्वत:च्या कल्याणाचा उद्देश हाच दृढ नसेल तर साधनाने सिद्धी कशी प्राप्त होईल? ॥ ३६ ॥

एका परमात्मप्राप्तीचा उद्देश झाल्यावर कोणतेही साधन श्रेष्ठ कनिष्ठ नसते. ॥ ३७ ॥

वास्तविक परमात्म्यशिवाय मनुष्य-जीवनाचे इतर कोणतेही प्रयोजन नाहीच. आवश्यकता केवळ ह्या प्रयोजनाला अथवा उद्देशाला ओळखून त्याला सिद्ध करण्याची आहे. ॥ ३८ ॥

उद्देश ही मनुष्याची प्रतिष्ठा आहे. ज्याचा कोणता उद्देश नाही, तो वास्तविक मनुष्य म्हणविण्यालायक नाही ॥ ३९ ॥

## (५) उन्नती

जी वस्तू, परिस्थिती इत्यादी आत्ता नाही, ती प्राप्त करण्यात स्वत:ची उन्नती, सफलता अथवा चातुर्य मानणे महान् चूक आहे. जी वस्तू आत्ता नाही, ती प्राप्त झाल्यानंतरही सदा राहणार नाही-हा नियम आहे. जी सदा आहे आणि सदा राहील अशी वस्तू (परमात्मतत्त्व) प्राप्त करण्यातच वास्तविक उन्नती, सफलता अथवा चातुर्य आहे. ॥ ४० ॥

पारमार्थिक उन्नती करणाऱ्याची लौकिक उन्नती आपोआप होते. ॥ ४१ ॥

विचार करा-आपण आपल्या ज्ञानाचा स्वत:च निरादर केला तर मग आपली उन्नती कशी होईल? ॥ ४२ ॥

वास्तविक उन्नती आहे-स्वभाव शुद्ध होणे. ॥ ४३ ॥

सांसारिक उन्नती वर्तमानातील गोष्ट नाही आणि पारमार्थिक

उन्नती भविष्यातील गोष्ट नाही. ॥ ४४ ॥

जो आराम इच्छितो, तो आपली वास्तविक उन्नती करू शकत नाही. ॥ ४५ ॥

जसे आकाशात वृक्ष कितीही उंच गेला तर त्याला कोणती सीमा नाही तसेच मनुष्याच्या उन्नतीचीही कोणती सीमा नाही. ॥ ४६ ॥

पारमार्थिक उन्नतीत संयोगजन्य सुखाची लोलुपता हीच खास बाधक आहे. ॥ ४७ ॥

मनुष्याचे उत्थान आणि पतन भावामुळे होते, वस्तू, परिस्थिती इत्यादीमुळे नाही. ॥ ४८ ॥

बुद्धीनुसार मन आणि मनानुसार इंद्रिया झाल्याने उत्थान होते. परंतु इंद्रियाच्या अनुसार मन आणि मनानुसार बुद्धी बनविल्याने पतन होते. ॥ ४९ ॥

## ( ६ ) एकान्त

शरीर-इंद्रिये-मन-बुद्धी यांच्याशी आपला संबंध न ठेवणे हाच वास्तविक एकान्त आहे. ॥ ५० ॥

शरीराचा संबंध-विच्छेद होणे अर्थात् त्यात अहंता-ममता न राहणे हाच वास्तविक एकान्त आहे. ॥ ५१ ॥

एकान्ताचा इच्छुक परिस्थितीच्या अधीन होतो. जो परिस्थितीच्या अधीन होतो, तो भोगी होतो योगी नव्हे. ॥ ५२ ॥

साधकाची जन-समुदायातही आसक्ती नसावी किंवा एकान्तातही आसक्ती नसावी. कल्याण परिस्थितीमुळे होत नाही, तर आसक्तीरहित झाल्याने होते. ॥ ५३ ॥

निर्जन-स्थानात जाण्याला अथवा एकटे पडून राहण्याला एकांत मानणे चूक आहे, कारण संपूर्ण संसाराचे बीज असलेले

हे शरीर तर बरोबरच राहते. जो पर्यंत शरीराबरोबर संबंध आहे, तोपर्यंत संपूर्ण संसाराबरोबर संबंध जडलेला आहे.॥५४॥

शरीरसुद्धा संसाराचेच एक अंग आहे. म्हणून शरीराचा संबंध विच्छेद होणे अर्थात् त्यात अहंता-ममता न राहणे हाच वास्तविक एकांत आहे.॥५५॥

साधकात एकांत-सेवनाची रूची असणे उत्तम आहे. परंतु त्याचा आग्रह (आसक्ती) चांगला नाही. आग्रह राहिल्याने एकांत मिळाला नाही तर अंत:करणात व्यग्रता होईल, त्यामुळे संसाराची महत्ता दृढ होईल.॥५६॥

## (७) कर्तव्य

मनुष्य प्रत्येक परिस्थिति आपल्या कर्तव्याचे पालन करू शकतो. कर्तव्याचे यथार्थ स्वरूप आहे—सेवा. अर्थात् संसारापासून मिळालेल्या शरीरादी पदार्थांना संसाराच्या हितात लावणे.॥५७॥

स्वत:चे कर्तव्य पालन करणाऱ्या मनुष्याच्या चित्तात स्वभाविक प्रसन्नता राहते. याच्या उलट स्वत:चे कर्तव्य पालन न करणाऱ्या मनुष्याच्या चित्तात स्वभाविक खिन्नता राहते.॥५८॥

साधक आसक्ति आसक्तिरहित तेव्हाच होऊ शकतो, जेव्हा तो शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी यांना 'माझे' अथवा 'माझ्यासाठी' न मानता केवळ संसाराचे आणि संसारासाठीच मानून संसाराच्या हितासाठी तत्परतापूर्वक कर्तव्य-कर्माचे आचरण करण्यात लागतो.॥५९॥

वर्तमान काळात घरात, समाजात जी अशांती, कलह, संघर्ष दिसतो त्यात मूळ कारण हेच आहे की, लोक स्वत:च्या अधिकाराची तर मागणी करतात, आपल्या कर्तव्याचे पालन करीत नाहीत.॥६०॥

कोणतेही कर्तव्य-कर्म श्रेष्ठ किंवा कनिष्ठ नसते. कनिष्ठाती कनिष्ठ आणि श्रेष्ठाती श्रेष्ठ कर्म केवळ कर्तव्य समजून (सेवाभावाने) केल्यास समानच होते. ॥ ६१ ॥

ज्यापासून दुसऱ्याचे हित होते, तेच कर्तव्य असते. ज्यापासून कोणाचेही. अहित होते, ते अकर्तव्य असते. ॥ ६२ ॥

राग-द्वेषामुळेच मनुष्याला कर्तव्य-पालनात परिश्रम अथवा कठिणता प्रतीत होते. ॥ ६३ ॥

जे केले पाहिजे आणि जे करू शकतो, त्याचे नाव कर्तव्य आहे. कर्तव्याचे पालन न करणे प्रमाद आहे. प्रमाद तमोगुण आहे आणि तमोगुण नरक आहे—**'नरकस्तमउन्नहः'** (श्रीमद्भा० ११। १९। ४३) ॥ ६४ ॥

स्वतःच्या सुखासाठी केले गेलेले कर्म 'असत्' आणि दुसऱ्याच्या हितासाठी केले गेलेले कर्म 'सत्' होते. असत् कर्माचा परिणाम जन्ममरणाची प्राप्ती आणि सत्-कर्माचा परिणाम परमात्मप्राप्ती आहे. ॥ ६५ ॥

उत्तमाती उत्तम कार्य करा, परंतु संसाराला स्थायी मानून करू नका. ॥ ६६ ॥

जो निष्काम असतो तोच तत्परतापूर्वक आपल्या कर्तव्याचे पालन करू शकतो. ॥ ६७ ॥

दुसऱ्यांकडे पाहणारा कधी कर्तव्यनिष्ठ होऊच शकत नाही. कारण दुसऱ्यांचे कर्तव्य पाहणे हेच अकर्तव्य आहे. ॥ ६८ ॥

गृहस्थी असो अथवा साधू असो, जो स्वतःच्या कर्तव्याचे योग्य रीतीने पालन करतो, तोच श्रेष्ठ आहे. ॥ ६९ ॥

स्वतःसाठी कर्मकरण्याने अकर्तव्याची उत्पत्ती होते. ॥ ७० ॥

स्वत:च्या कर्तव्याचे (धर्माचे) योग्य रीतीने पालन केल्याने वैराग्य होते— '**धर्म तें बिरति**' (मानस ३। १६। १) जर वैराग्य झाले नाही तर समजावे की, आपण आपल्या कर्तव्याचे योग्य रीतीने पालन केले नाही. ॥ ७१ ॥

स्वत:च्या कर्तव्याचे ज्ञान आपल्यात विद्यमान आहे. परंतु कामना आणि ममता असल्यामुळे आपण आपल्या कर्तव्याचा निर्णय करू शकत नाही. ॥ ७२ ॥

चारी वर्णात आणि आश्रमात तीच व्यक्ती श्रेष्ठ आहे, जी स्वत:च्या कर्तव्याचे पालन करते. जो कर्तव्यच्युत होतो तो निकृष्ट होतो. ॥ ७३ ॥

संसाराचे सर्व संबंध स्वत:चे कर्तव्य पालन करण्यासाठीच आहेत, अधिकार गाजविण्यासाठी नाहीत. सुख देण्यासाठीच आहेत, सुख घेण्यासाठी नव्हे. ॥ ७४ ॥

केवळ स्वत:च्या कल्याणाचा उद्देश असेल तर शास्त्र न वाचताही आपल्या कर्तव्याचे ज्ञान होईल. परंतु स्वत:च्या कल्याणाचा उद्देश नसेल तर शास्त्र वाचूनही कर्तव्याचे ज्ञान होणार नाही. उलट अज्ञान वाढेल की आम्ही जाणतो! ॥ ७५ ॥

## (८) कल्याण

माझे काही नाही, मला काहीही नको आणि मला स्वत:साठी काहीही करायचे नाही—ह्या तीन गोष्टी शीघ्र उद्धार करणाऱ्या आहेत ॥ ७६ ॥

भगवंताचा संकल्प आपल्या कल्याणासाठी आहे. जर आपण आपला स्वत:चा कोणताही संकल्प ठेवला नाही तर भागवंताच्या संकल्पानुसार आपोआप आपले कल्याण होईल. ॥ ७७ ॥

संसारात अशी कोणतीही परिस्थिती नाही ज्यात मनुष्याचे कल्याण होऊ शकत नाही. कारण परमात्मा प्रत्येक परिस्थितीत समानरूपाने विद्यमान आहे. ॥ ७८ ॥

कल्याणाची प्राप्ती फारच सुगम आहे. परंतु कल्याणाची इच्छाच नसेल तर ती सुगमता काय कामाची? ॥ ७९ ॥

संसाराचे काम तर दुसरा कोणीही करेल. परंतु आपल्या कल्याणाचे काम तर स्वतःलाच करावे लागेल. जसे—भोजन आणि औषध स्वतः-लाच घ्यावे लागते. ॥ ८० ॥

स्वतःच्या कल्याणासाठी एख्याद्या नवीन परिस्थितीची आवश्यकता नाही. प्राप्त परिस्थितीच्या सदुपयोगाने कल्याण होऊ शकते. ॥ ८१ ॥

कल्याण क्रियेने होत नाही, भाव आणि विवेकाने होते. ॥ ८२ ॥

घरात राहणारे सर्व लोक स्वतःला सेवक आणि दुसऱ्याला सेव्य समजतील तर सर्वांची सेवा होईल आणि सर्वांचे कल्याण होईल. ॥ ८३ ॥

भोगांची प्रियता जन्म-मरण देणारी आणि भगवंताची प्रियता कल्याण करणारी आहे. ॥ ८४ ॥

स्वतःच्या कल्याणाच्या इच्छुकाने जर अंतःकरणा पासून प्रार्थना केली तर भगवंताच्या दरबारामध्ये त्याचा निर्णय लवकर होतो. ॥ ८५ ॥

कोणाचे ही कल्याण होते तेव्हा त्याच्या मुळाशी कोण्या संतांची किंवा भगवंताची कृपा असते. ॥ ८६ ॥

संसारात संत-महात्म्यांची, उपदेश देणाऱ्यांची उणीव नाही. परंतु आपले कल्याण करण्यात स्वतःची लगन, लालसा, मान्यता, श्रद्धा हीच कामी येते. ॥ ८७ ॥

## ( ९ ) कामना

जोपर्यंत साधकात आपल्या सुख, आराम, मान, मोठेपणा इत्यादीची कामना आहे, तोपर्यंत त्याचे व्यक्तित्व नाहीसे होत नाही आणि व्यक्तित्व नाहीसे झाल्याशिवाय तत्त्वाशी अभिन्नता होत नाही. ॥ ८८ ॥

जेव्हा आपल्या अंत:करणात कोणत्याही प्रकारची कामना राहणार नाही, तेव्हा आपल्याला भगवत्प्राप्तीचीही इच्छा करावी लागणार नाही, तर भगवान् स्वत: प्राप्त होतील. ॥ ८९ ॥

संसाराच्या कामनेपासून पशूतेचा आणि भगवंताच्या कामनेपासून मानवतेचा आरंभ होते. ॥ ९० ॥

'माझ्या मनाप्रमाणे व्हावे'—ह्यालाच कामना म्हणतात. ही कामनाच दु:खाला कारण आहे. हिचा त्याग केल्याविना कोणी सुखी होऊ शकत नाही. ॥ ९१ ॥

मला सुख कसे मिळेल—केवळ ह्याच कामनेमुळे मनुष्य कर्तव्यच्युत आणि पतीत होतो. ॥ ९२ ॥

कामना उत्पन्न होताच मनुष्य आपल्या कर्तव्यापासून, आपल्या स्वरूपापासून आणि आपल्या इष्टापासून (भगवंतापासून) विमुख होतो आणि नाशवान् संसाराच्या सम्मुख होतो. ॥ ९३ ॥

साधकाने तर लौकिक कामनांच्या पूर्तीचीही आशा ठेवू नये आणि पारमार्थिक कामनापूर्ती झाली नाही तर निराशही होऊ नये. ॥ ९४ ॥

कामनांच्या त्यागात सर्व स्वतंत्र, अधिकारी, योग्य आणि समर्थ आह्रेत. परंतु कामनांच्या पूर्तीत कोणीही स्वतंत्र, अधिकारी,

योग्य आणि समर्थ नाही. ॥ ९५ ॥

जस-जशा कामना नष्ट होतात, तस-तशी साधुता येते आणि जस-जशा कामना वाढतात, तस-तशी साधुता लुप्त होते. कारण असाधुतेचे मूळ कारण कामनाच आहे. ॥ ९६ ॥

केवळ कामना करण्याने कोणताही पदार्थ प्राप्त होत नाही. कदाचित मिळाला तरीही तो नेहमी बरोबर राहत नाही— अशी गोष्ट प्रत्यक्षात असूनही पदार्थांची कामना ठेवणे प्रमादच आहे. ॥ ९७ ॥

जीवन तेव्हाच कष्टमय होते, जेव्हा संयोगजन्य सुखाची इच्छा केली जाते आणि मृत्यु तेव्हाच कष्टमय होतो, जेव्हा जगण्याची इच्छा केली जाते. ॥ ९८ ॥

जर वस्तूच्या इच्छेची पूर्ती झाली असती तर पूर्ती करण्याचा प्रयत्न केला असता आणि जर जगण्याची इच्छा पूर्ण झाली असती तर मृत्यूपासून बचावाचा प्रयत्न केला असता. परंतु इच्छेनुसार सर्व वस्तू ही प्राप्त होत नाहीत आणि मृत्युपासून बचावही होत नाही. ॥ ९९ ॥

इच्छेचा त्याग करण्यात सर्व स्वतंत्र आहेत, कोणी पराधीन नाही आणि इच्छापूर्ती करण्यात सर्व पराधीन आहेत, कोणी स्वतंत्र नाही. ॥ १०० ॥

सुखाची इच्छा, आशा आणि भोग— हे तिन्ही संपूर्ण दुःखांचे कारण आहेत. ॥ १०१ ॥

नाशवानाच्या इच्छेचा त्याग केल्याने अविनाशी तत्त्वाची प्राप्ती होते. ॥ १०२ ॥

असे व्हायला पाहिजे आणि असे व्हायला नको— यातच सर्व दुःखांचा समावेश आहे. ॥ १०३ ॥

आपला सन्मान व्हावा—या इच्छेनेच आपला अपमान केला आहे. ॥ १०४ ॥

मनात कोणत्याही वस्तूची इच्छा ठेवणे हीच दरिद्रता आहे. घेण्याची इच्छा ठेवणारा नेहमी दरिद्रीच राहतो ॥ १०५ ॥

नाशवानाची इच्छा हीच अंत:करणाची अशुद्धी आहे. ॥ १०६ ॥

मनुष्याला कर्मांचा त्याग करायचा नाही, तर कामनेचा त्याग करायचा आहे. ॥१०७ ॥

मनुष्याला वस्तू गुलाम (दास) करीत नाही, त्याची इच्छा गुलाम करते. ॥ १०८ ॥

जर तुम्हाला शांती पाहिजे असेल तर कामनेचा त्याग करा. ॥ १०९ ॥

काहीही घेण्याची इच्छा भयकर दु:खदेणारी आहे. ॥ ११० ॥

ज्याच्या अंत:करणात इच्छा आहे, त्याला कोणाच्याना कोणाच्या पराधीन व्हावेच लागेल. ॥ १११ ॥

स्वत:साठी सुख इच्छिणे आसुरी, राक्षसी वृत्ती आहे. ॥ ११२ ॥

जसे इच्छेविना सांसारिक दु:ख प्राप्त होते, तसेच इच्छेविना सुखही प्राप्त होते. म्हणून साधकाने सांसारिक सुखाची इच्छा कधीच करू नये. ॥ ११३ ॥

भोग आणि संग्रहाची इच्छा पाप करविण्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही कामी येत नाही. म्हणून त्या इच्छेचा त्याग केला पाहिजे. ॥ ११४ ॥

स्वत:साठी भोग आणि संग्रहाची इच्छा केल्याने मनुष्य पशूपेक्षाही निकृष्ट होतो आणि त्यांच्या इच्छेचा त्याग केल्याने देवतां पेक्षाही श्रेष्ठ होतो. ॥ ११५ ॥

जी वस्तू आपली आहे. ती आपल्याला मिळणारच ती दुसरा कोणी घेऊ शकत नाही. म्हणून कामना न करता आपल्या कर्तव्याचे पालन केले पाहिजे. ॥ ११६ ॥

जसे मी इच्छिल तसे व्हावे—अशी इच्छा जोपर्यंत राहील तोपर्यंत शांती मिळू शकत नाही. ॥ ११७ ॥

मनुष्य समजदार असूनही उत्पत्ति-विनाशशील वस्तूंची इच्छा करतो—ही आश्चर्याची गोष्ट आहे. ॥ ११८ ॥

शरीरात आपली स्थिती मानल्यानेच नाशवानाची इच्छा होते आणि इच्छा झाल्यानेच शरीरात आपली स्थिती दृढ होते. ॥ ११९ ॥

काही इच्छा केल्याने काही मिळते आणि काही मिळत नाही. परंतु काहीही इच्छा न केल्याने सर्वकाही मिळते. ॥ १२० ॥

निंदा यामुळे वाईट लागते की आपण प्रशंसा इच्छित आहोत आपण प्रशंसा इच्छित आहोत म्हणजेच आपण वास्तविक प्रशंसेच्या लायक नाही. कारण जो प्रशंसेच्या लायक असतो त्याच्यात प्रशंसेची इच्छा राहत नाही. ॥ १२१ ॥

दुसऱ्याकडून चांगले म्हणवून घेण्याची इच्छा ही फार मोठी निर्बलता आहे. म्हणून चांगले व्हा, चांगले म्हणवून घेऊ नका. ॥ १२२ ॥

सांसारिक सुखाच्या इच्छेचा केव्हा ना केव्हा तरी त्याग करावाच लागेल तर मग उशीर कशाला? ॥ १२३ ॥

जितके शक्य होईल तितके दुसऱ्यांच्या आशा पूर्तीचा प्रयत्न करा. परंतु दुसऱ्यांकडून आशा ठेवू नका. ॥ १२४ ॥

विचार करा, ज्याच्याकडून तुम्ही सुख इच्छित आहात, तो काय सर्वथा सुखी आहे? तो दुःखी नाहीका? दुःखी व्यक्ती तुम्हाला सुखी कसा करील? ॥ १२५ ॥

कामनेच्या त्यागाने जे सुख होते, ते सुख कामनेच्या पूर्तीने कधी होत नाही. ॥ १२६ ॥

परमात्म्याची उत्कट अभिलाषा इच्छित असाल तर संसाराच्या अभिलाषेचा त्याग करा. ॥ १२७ ॥

जो बदलणाऱ्याची (संसाराची) इच्छा करतो, त्यापासून सुख घेतो, तोही बदलत राहतो अर्थात् अनेक योनीत जन्मत-मरत राहतो. ॥ १२८ ॥

ज्याला आपण नेहमीसाठी आपल्याजवळ ठेवू शकत नाही, त्याची इच्छा करण्याने आणि त्याला प्राप्त करूनही काय लाभ? ॥ १२९ ॥

कामनेमुळे उणीव आहे. कामनारहित झाल्यावर कोणतीही उणीव बाकी राहत नाही. ॥ १३० ॥

कामनेचा सर्वथा त्याग केला तर आवश्यक वस्तू आपोआप प्राप्त होतील. कारण वस्तू निष्काम पुरुषाजवळ येण्यासाठी लालायित असतात. ॥ १३१ ॥

जो स्वतःसाठी वस्तूंची इच्छा करतो, त्याला वस्तूंच्या अभावाचे दुःख भोगावेच लागेल. ॥ १३२ ॥

ज्याच्या अंतःकरणात कोणतीही इच्छा नसते, त्याच्या आवश्यक-तांची पूर्ती प्रकृती स्वतः करते. ॥ १३३ ॥

जो सदा आपल्या बरोबर राहणार नाही आणि आपण सदा ज्याच्या बरोबर राहणार नाही, ते प्राप्त करण्याची इच्छा करणे अथवा त्याच्यापासून सुख घेणे मूर्खपणा आहे, पतनाला करण आहे. ॥ १३४ ॥

सुखाच्या इच्छेने सुख मिळत नाही— हा नियम आहे. ॥ १३५ ॥

तुम्ही साधू व्हा अथवा गृहस्थी रहा, जोपर्यंत कामना (काही

मिळविण्याची इच्छा) राहील, तोपर्यंत शांती मिळू शकत नाही. ॥ १३६ ॥

जर शांती इच्छित असाल तर असे झाले पाहिजे, असे होता कामा नये हे सोडून द्या आणि भगवान् जे इच्छितील तेच व्हावे- हे स्वीकार करा. ॥ १३७ ॥

कामनापूर्वक केले गेलेले सर्व कार्य असत् आहे, त्याचे फल नाशवान् राहील. ॥ १३८ ॥

कोणतीही इच्छा ठेवणे परतंत्रता आहे आणि कोणतीही इच्छा न ठेवणे स्वतंत्रता आहे. ॥ १३९ ॥

वस्तू न मिळण्यामुळे आपण अभागी नाहीत, तर भगवंताचे अंश असूनही आपण नाशवान् वस्तुची इच्छा करतो—हेच आपले दुर्भाग्य आहे. ॥ १४० ॥

सुखाच्या इच्छेनेच द्वैत होते. सुखाची इच्छा नसेल तर द्वैत नाहीच. ॥ १४१ ॥

जोपर्यंत शरीराला आपले मानत रहाल, तोपर्यंत आपली कामना समाप्त होऊ शकणार नाही. ॥ १४२ ॥

विचार करा, कामनेची पूर्ती झाल्यावरही आपण तेच राहतो आणि पूर्ती झाली नाही तरी आपण तेच राहतो, मग कामनेच्या पूर्तीपासून आपणाला काय मिळाले आणि पूर्ती झाली नाही म्हणून कोणती हानी झाली? आपल्यात काय फरक पडला? ॥ १४३ ॥

## ( १० ) गुरू आणि शिष्य

जो जगताचा गुरू बनतो, तो जगताचा दास होतो आणि जो आपला आपण गुरू होतो, तो जगताचा गुरू होतो. ॥ १४४ ॥

कल्याण प्राप्तीत स्वत:ची लगन कामी येते. स्वत:ची लगन नसेल तर गुरू काय करील? शास्त्र काय करील? ॥ १४५ ॥

जो आमच्यापासून काही तरी इच्छितो, तो आमचा गुरू कसा होऊ शकतो? ॥ १४६ ॥

पुत्र आणि शिष्याला आपल्यापेक्षा श्रेष्ठ बनविण्याचे विधान तर आहे, परंतु आपला दास बनविण्याचे विधान नाही. ॥ १४७ ॥

गुरूमध्ये मनुष्यबुद्धी करणे आणि मनुष्यात गुरुबुद्धी करणे अपराध आहे. कारण गुरू तत्त्व आहे, शरीराचे नाव गुरू नाही. ॥ १४८ ॥

शिष्य दुर्लभ आहे, गुरू नव्हे. सेवक दुर्लभ आहे, सेव्य नव्हे. जिज्ञासू दुर्लभ आहे, ज्ञान नव्हे. भक्त दुर्लभ आहे, भगवान् नव्हे. ॥ १४९ ॥

जो आमच्यापासून धन-संपत्ती, सुख-सुविधा, मान-सन्मान, पूजा-सत्कार इत्यादी काहीही इच्छितो, तो आमचे कल्याण करू शकत नाहीं. ॥ १५० ॥

जगत, जीव आणि परमात्मा—या तिन्हींना न जाणणे अन्धकार आहे. जो या अन्धकाराला नाहीसे करील, तो गुरू आहे. ॥ १५१ ॥

गुरू शिष्यासाठी असतो, शिष्य गुरू साठी नसतो. राजा प्रजेसाठी असतो, प्रजा राजासाठी नसते. ॥ १५२ ॥

भगवान् जगद्गुरु असूनही मनुष्याला कधी शिष्य बनवित नाहीत, तर सखाच बनवितात. ॥ १५३ ॥

गुरू शिष्याला कोणते नवीन ज्ञान प्रदान करीत नाही, तर त्याच्या अंत:करणात पूर्वीपासून विद्यमान असलेले जे ज्ञान आहे, त्यालाच जागृत करतात. ॥ १५४ ॥

खरा गुरू दुसऱ्याला गुरुच बनवितो, शिष्य बनवित नाही, जो शिष्य बनवू इच्छितो, तो शिष्याचा दास होतो. ॥ १५५ ॥

आपला वास्तविक गुरू आपल्यात आहे, तो आहे— विवेक. हा विवेक भगवंताने प्रदान केला आहे. भगवंताने आमच्या कल्याणासाठी मनुष्यशरीर दिले आहे, सर्व साधन-सामुग्री दिली आहे, तर काय गुरु देण्याचे शिल्लक ठेवतील? ॥ १५६ ॥

## ( ११ ) चिन्ता

शरीर-निर्वाहासाठी चिन्ता (विचार) करण्याची आवश्यकताच नाही. परंतु शरीर सोडल्यावर काय होईल-यासाठी चिंता करण्याची खूप आवश्यकता आहे. ॥ १५७ ॥

जे होणारे आहे ते होऊनच राहील आणि जे होणारे नाही ते कधी होणार नाही, मग चिंता कोणत्या गोष्टीची? ॥ १५८ ॥

आपल्याला आपल्यासाठी काही नको. कारण स्वरूपात अभाव नाही आणि शरीराला जे आवश्यक आहे ते प्रारब्धानुसार पूर्वीच निश्चित आहे. मग चिंता कोणत्या गोष्टीची? ॥ १५९ ॥

भगवंताद्वारा आपल्या निर्वाहाची व्यवस्था तर आहे. परंतु भोगाची योजना नाही. म्हणून निर्वाहाची चिंता आणि भोगाची इच्छा करू नये. ॥ १६० ॥

भगवान् जे काही करतात आणि करतील, त्यातच माझे हित आहे-असा विश्वास करून प्रत्येक परिस्थितीच्या प्राप्तीत निश्चिंत राहवे. ॥ १६१ ॥

दु:ख-चिंतेचे कारण वस्तूंचा अभाव नाही, तर मूर्खपणा आहे. हा मूर्खपणा सत्संगाने समाप्त होतो. ॥ १६२ ॥

मनुष्य जस-जसा आपल्या शरीराची चिंता सोडतो, तस-तसे संसार त्याच्या शरीराची चिंता करू लागतो. ॥ १६३ ॥

भगवंताच्या भरवशावर राहिल्यास कोणत्याही प्रकारची चिंता

टिकूच शकत नाही.॥ १६४॥

जे करायला नको ते करण्याने आणि जे करायला पाहिजे ते न करण्याने चिंता आणि भय होते॥ १६५॥

भगवान् आपल्यापेक्षा अधिक जाणतात, आपल्यापेक्षा अधिक समर्थ आहेत आणि आपल्यापेक्षा अधिक दयाळू आहेत, मग आपण चिंता का करावी?॥ १६६॥

## (१२) चेतावनी

मृत्युकालाची सर्व सामुग्री तयार आहे. प्रेतावर टाकण्याचे वस्त्रही तयार आहे. नवीन तयार करावे लागणार नाही. उचलणारी माणसेही तयार आहेत. नवीन जन्मणार नाहीत. जाळण्याची जागाही तयार आहे, नवी घ्यावी लागणार नाही. जाळण्यासाठी लाकडे तयार आहे, नवीन वृक्ष लावावे लागणार नाहीत. केवल श्वास बंद होण्याचा अवकाश आहे. श्वास बंद होताच ही सर्व सामुग्री एकत्र होईल. मग तुम्ही निश्चिंत कसे बसले आहात?॥ १६७॥

जागे व्हा! हा संसार सदा राहण्यासाठी नाही. येथे केवळ मरणारेच मरणारे राहतात. मग तुम्ही निश्चिंत कसे बसला आहात?॥ १६८॥

विचार करा! हे दिवस काय सदा असेच राहतील?॥ १६९॥

येथे घर बांधत आहात, येथे शृंगार करीत आहात, येथे संग्रह करीत आहात. परंतु स्वतः मृत्युकडे धावत जात आहात! जेथे जावयाचे आहे, अगोदर त्याला ठीक करा!॥ १७०॥

निश्चित वेळेवर जाणाऱ्या गाडीसाठीही जर पूर्वीपासून सावधानी राहते. मग ज्या मृत्युरूपी गाडीचा कोणताही सवेळय निश्चित

नाही, त्यासाठी तर प्रत्येक क्षणी सावधान राहिले पाहिजे. ॥ १७१ ॥

'करू' हे निश्चित नाही.परंतु 'मरू' हे निश्चित आहे. ॥ १७२ ॥

तुम्ही भगवंताला पाहत नाही, परंतु भगवंत तुम्हाला निरंतर पाहत आहेत. ॥ १७३ ॥

येणारा हा जाणारा असतो—हा नियम आहे. ॥ १७४ ॥

कालरूपी अग्नीत सर्वकाही निरंतर जळत आहे. मग कोणाचा भरवसा करावा? कशाची इच्छा करावी?॥ १७५ ॥

विचार करा! आपले कोण आहे? जर आत्ता मृत्यू आला तर कोणी आपली साहय्यता करू शकतो काय?॥ १७६ ॥

वाढदिवस आल्यावर खूप आनंद मानतात की, आपण इतक्या वर्षांचे झालो! वास्तविक इतक्या वर्षांचे झालो नाही तर इतके वर्ष मरून गेलो! अर्थात् आपल्या आयुष्यातून इतके वर्ष कमी झाले आणि मरण जवळ आले!॥ १७७ ॥

बालक जन्मतो तर तो मोठा होईल का नाही, शिकेल की नाही, त्याचा विवाह होईल की नाही, त्याला मुले-बाळे होतील की नाही, त्याच्या जवळ संपत्ती राहील की नाही इत्यादी सर्व गोष्टीत संदेह आहे. परंतु तो मरेल की नाही—यात कोणताही संदेह नाही!॥ १७८ ॥

## ( १३ ) तत्त्वज्ञान

परमात्मतत्त्वाचे ज्ञान करण-निरपेक्ष आहे. म्हणून त्याचा अनुभव स्वतः-स्वतः द्वाराच होऊ शकतो. इंद्रिये-मन-बुद्धी इत्यादी करणांनी नाही. ॥ १७९ ॥

जोपर्यंत नाशवान् वस्तूं मध्ये सत्यता दिसेल, तोपर्यंत बोध होणार नाही. ॥ १८० ॥

बोध झाल्यावर आपल्यात दोष राहत नाहीत आणि गुण (विशेषता) दिसत नाहीत. ॥ १८१ ॥

जे आपले स्वरूप नाही, त्याचा त्याग (संबंध-विच्छेद) केला तर जे आपले स्वरूप आहे त्याचा बोध होईल. ॥ १८२ ॥

साधकामध्ये कोणताही आग्रह राहू नये, द्वैताचा किंवा अद्वैताचा! आग्रह राहिल्याने बोध होत नाही. ॥ १८३ ॥

जोपर्यंत अहम् आहे, तोपर्यंत तत्त्वज्ञानाचा अभिमान तर होऊ शकतो. परंतु वास्तविक तत्त्वज्ञान होऊ शकत नाही. ॥ १८४ ॥

जोपर्यंत आपल्यात राग-द्वेष आहेत, तोपर्यंत तत्त्वबोध झाला नाही, केवळ शाब्दिक ज्ञान झाले ॥ १८५ ॥

तत्त्वज्ञान होण्यास अनेक जन्म लागत नाहीत. उत्कट अभिलाषा झाल्यास मिनिटात होऊ शकते. कारण तत्त्व सदा-सर्वदा विद्यमान आहे. ॥ १८६ ॥

तत्त्वज्ञान अभ्यासाने होत नाही, तर आपल्या विवेकाला महत्त्व दिल्याने होते. अभ्यासाने एक नवीन अवस्था बनते, तत्त्व प्राप्त होत नाही. ॥ १८७ ॥

जोपर्यंत तत्त्वज्ञान होत नाही, तोपर्यंत सर्व प्राणी कैदी आहेत. कैद्याचे लक्षण असे आहे—पापकर्म आपल्या मर्जीने करायचे आणि दुसऱ्याच्या मर्जीने दु:ख भोगायचे. ॥ १८८ ॥

'मी ब्रह्म आहे'—हा अनुभव नाही, तर अहंग्रह उपासना आहे. म्हणून तत्त्वज्ञान झाल्यावर 'मी ब्रह्म आहे'—हा अनुभव होत नाही. ॥ १८९ ॥

तत्त्वज्ञान झाल्यावर काम-क्रोधादी विकारांचा अत्यंत अभाव होतो. ॥ १९० ॥

जोपर्यंत आपल्या दृष्टीत असत्‌ची सत्ता आहे, तोपर्यंत विवेक आहे. असत्‌ची सत्ता समाप्त झाल्यावर विवेकच तत्त्वज्ञानात परिणत होतो. ॥ १९१ ॥

आपल्यात आणि दुसऱ्यांत निर्दोषतेचा अनुभव होणे तत्त्वज्ञान आहे, जीवन्मुक्ती आहे. ॥ १९२ ॥

तत्त्वज्ञान झाल्यावर ज्ञानी पुरुष परिस्थितीरहित होत नाही, तर सुख-दुःखरहित होतो. ॥ १९३ ॥

तत्त्वज्ञान शरीराचा नाश करीत नाही, तर शरीराच्या संबंधाचा अर्थात् अहंता-ममतेचा नाश करते. ॥ १९४ ॥

तत्त्वज्ञान अर्थात् अज्ञानाचा नाश एकदाच होतो आणि नेहमीसाठी होतो. ॥ १९५ ॥

जसे आहे, तसे अनुभव करण्याचे नाव 'ज्ञान' आहे. जसे नाहीच तसे मानण्याचे नाव 'अज्ञान' आहे. ॥ १९६ ॥

## (१४) त्याग

पूर्ण त्याग तेव्हाच होतो जेव्हा त्यागाचा किंचितही अभिमान येत नाही. अभिमान तेव्हाच येतो, जेव्हा अंतःकरणात त्याज्य वस्तूचे महत्त्व पटलेले असते. म्हणून वस्तूच्या त्यागापेक्षा तिच्या महत्त्वतेचा त्याग श्रेष्ठ आहे. ॥ १९७ ॥

जोपर्यंत कोणाशी काहीतरी प्रयोजन राहते, तोपर्यंत वास्तविक त्याग होत नाही. ॥ १९८ ॥

काम-क्रोध, अहंता-ममता इत्यादीला जर आपण पकडण्याचे जाणतो तर त्यांना सोडणेही आपण जाणतोच. परंतु आपण त्यांना सोडू इच्छित नाही. म्हणून त्यांच्या त्यागात असमर्थता प्रतीत होत आहे. ॥ १९९ ॥

मुक्ती इच्छेच्या त्यागाने होते, वस्तूच्या त्यागाने नव्हे. ॥ २०० ॥

शरीर कधीही आपल्या उपयोगी पडत नाही. परंतु शरीराच्या मी-माझेपणाचा त्यागच आपल्या उपयोगी येतो. ॥ २०१ ॥

शरीर-संसार आपोआप आपल्यापासून वेगळे होत आहे, परंतु त्यापासून कल्याण होणार नाही. वेगळे होणाऱ्या वस्तूला तुम्ही सोडून द्याल, त्यातून मी-माझेपणा काढून घ्याल, तर कल्याण होईल. ॥ २०२ ॥

अंतकरणात रूपयांचे महत्त्व असल्याने रुपयांच्या त्यागाची विशेषता दिसते आणि त्यांच्या त्यागाचा अभिमान येतो. म्हणून त्यागाच्या अभिमानात रुपयांचेच महत्त्व आहे. ॥ २०३ ॥

त्याग केल्याने आपली उन्नती होते, तसेच वस्तू शुद्ध होते आणि भोग भोगल्याने आपले पतन होते व वस्तूचा नाश होतो. ॥ २०४ ॥

मनुष्य स्वतः तर भोगी बनतो, परंतु दुसऱ्यांना त्यागी असलेले पाहू इच्छितो—हा अन्याय आहे. जर त्याला त्यागी माणूस आवडत असेल तर तो स्वतः त्यागी का होत नाही? ॥ २०५ ॥

वास्तविक त्याग तो आहे, ज्यात त्यागवृत्तीचाही त्याग झाला आहे. ॥ २०६ ॥

## (१५) दोष (विकार)

सर्वथा निर्दोष जीवनतर सर्वांचे होऊ शकते. परंतु सर्वथा दोषी जीवन कधी कोणाचे होऊच शकत नाही. कारण भगवंताचा अंश असल्यामुळे जीव स्वतः निर्दोष आहे. दोष आगन्तुक आहेत आणि नाशवानाच्या संगाने येतात. ॥ २०७ ॥

साधक जेव्हा आपल्या दोषांना दोषरूप पाहून त्यांच्या दुःखाने

दु:खी होतो, त्यांचे राहणे त्याला असह्य होते, तेव्हा त्याचे दोष टिकू शकत नाहीत. भगवंताची कृपा त्या दोषांचा शीघ्रतेने नाश करते. ॥ २०८ ॥

जितके काही विकार आहेत, हे सर्व नाशवान् वस्तूला महत्त्व देण्यानेच उत्पन्न होतात. ॥ २०९ ॥

फसविणे दोष आहे, फसले जाण्यात दोष नाही. ॥ २१० ॥

सर्वांत भगवद्भाव करण्याने संपूर्ण विकारांचा नाश होतो. ॥ २११ ॥

संतोषाने काम, क्रोध आणि लोभ— तिन्ही नष्ट होतात. ॥ २१२ ॥

दोषांची स्वतंत्र सत्ता नाही. गुणांच्या उणीवेचे नावच दोष आहे आणि ती उणीव असत्‌ला सत्ता व महत्ता देण्यानेच येते. ॥ २१३ ॥

सर्वच विकार विकारीतच (शरीरातच) असतात-निर्विकारात (स्वरूपात) कोणताही विकार नसतो. ॥ २१४ ॥

मूळ दोष एकच आहे, ज्यापासून संपूर्ण दोष उत्पन्न होतात. तो आहे— संसाराचा संबंध. त्याचप्रमाणे मूळ गुणही एकच आहे, ज्यापासून संपूर्ण गुण प्रकट होतात. तो आहे-भगवंताचा संबंध. ॥ २१५ ॥

लोभामुळे आवश्यक वस्तूची प्राप्ती होत नाही आणि प्राप्त वस्तूचा सदुपयोग होत नाही. ॥ २१६ ॥

## ( १६ ) दोषदृष्टी

आपल्यात गुणांचा अभिमान झाल्यानेच दुसऱ्यात दोष दिसतात आणि दुसऱ्यात दोष पहिल्याने आपला अभिमान पुष्ट होतो. ॥ २१७ ॥

जो साधक आपल्या दोषांना समाप्त करू इच्छितो त्याने दुसऱ्याच्या दोषांकडे पाहू नये. दुसऱ्यांचे दोष पाहण्याने आपले दोष पुष्ट होतात आणि दोषांशी संबंध झाल्याने नव-नवीन दोष उत्पन्न होतात. ॥ २१८ ॥

दुसऱ्यांचे दोष पाहण्याने आपलेही भले होत नाही किंवा दुसऱ्यांचेही ! ॥ २१९ ॥

मनुष्याचे अंत:करण जितके दोषी (मलिन) असते तितके त्याला दुसऱ्यात दोष दिसतात. रेडियोप्रमाणे मलिन अंत:करणच दोषांना पकडते. ॥ २२० ॥

जर तुम्ही इच्छा करीत असाल की, मला कोणीही वाईट समजू नये तर दुसऱ्याला तुम्ही वाईट समजू नका. ॥ २२१ ॥

कोणालाही वाईट समजले नाही तर अंत:करणात चांगुलपणा प्रकट होतो. अंत:करणात प्रकट झालेला चांगुलपणा ठोस आणि व्यापक असतो. ॥ २२२ ॥

जर तुम्ही आपली निर्दोषता सुरक्षित ठेवू इच्छित असाल तर कोणताही दोष पाहू नका. आपल्यातही पाहू नका आणि दुसऱ्यातही ॥ २२३ ॥

दुसऱ्याला निर्दोष बनविण्याच्या नीयतीने त्याचे दोष पाहण्यात वाईटपणा नाही. दुसऱ्याचे दोष दिसले तर प्रसन्न होणे—हा वाईटपणा आहे. ॥ २२४ ॥

सर्वांचे स्वरूप सहज निर्दोष आहे. म्हणून पुत्र, शिष्य इत्यादींना स्वरूपाने निर्दोष मानून आणि त्यांच्यात दिसणाऱ्या दोषाला आगन्तुक मानूनच त्यांना शिकवण दिली पाहिजे. त्यांच्या आगन्तुक दोषाला नाहीसे करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ॥ २२५ ॥

जर आपण दुसऱ्यात दोष मानले तर त्यात ते दोष येतील. कारण त्यात दोष पाहिल्याने आपले त्याग, तप, बल इत्यादीही त्या दोषाला उत्पन्न करण्यात स्वाभाविक सहायक होतील, ज्यामुळे तो व्यक्ती दोषी होईल आणि आपलेही नुकसान होईल. ॥ २२६ ॥

## (१७) धन

रुपयांना सर्वापेक्षा श्रेष्ठ मानणे बुद्धी भ्रष्ट झाल्याचे लक्षण आहे. ॥ २२७ ॥

धर्मासाठी धन नको, मन पाहिजे. ॥ २२८ ॥

धन कोणालाही आपला दास बनवित नाही. मनुष्य स्वतःच धनाचा दास होऊन आपले पतन करतो. ॥ २२९ ॥

रुपयांमुळे कोणी सेठ होत नाही, तर दरिद्री बनतो! वास्तविक सेठ तोच आहे जो श्रेष्ठ आहे अर्थात् ज्याला कधीच कशाची इच्छा नाही. ॥ २३० ॥

आता जे धन मिळत आहे, ते वर्तमान कर्माचे फल नाही, तर प्रारब्धाचे फल आहे. वर्तमानात धनप्राप्तीसाठी लबाडी, कपट, बेईमानी, चोरी इत्यादी केले तर त्याचे फल (दंड) तर पुढे मिळेल. ॥ २३१ ॥

अन्यायपूर्वक कमविलेले धन आपल्या उपयोगी पडेल—हा नियम नाही. परंतु त्याचा दंड भोगावा लागेल—हा नियम आहे. ॥ २३२ ॥

जेथे रुपयांची अपेक्षा असते, तेथे परमार्थ होत नाही, तर रुपयांचे दास्यत्व होते. ॥ २३३ ॥

जसे आपले दुःख नाहीसे करण्यासाठी रुपये खर्च करतो, तसेच दुसऱ्यांचे दुःख नाहीसे करण्यासाठीही खर्च करावे, तरच आपल्याला रुपये जवळ ठेवण्याचा हक्क आहे. ॥ २३४ ॥

धनासाठी लबाडी, कपट, बेईमानी इत्यादी केल्याने जितकी हानी होते तितका लाभ होतच नाही अर्थात् तितके धन येतच नाही आणि जितके धन येते, तितके पूर्ण चे पूर्ण कामी येतच नाही. म्हणून थोड्याशा लाभासाठी इतकी अधिक हानी करणे कुठली बुद्धिमानी आहे? ॥ २३५ ॥

मेल्यावर स्वभाव बरोबर जाईल, धन बरोबर जाणार नाही. परंतु मनुष्य स्वभावाला बिघडवित आहे आणि धनचा संग्रह करीत आहे. बुद्धीच्या अज्ञानतेची कमाल! ॥ २३६ ॥

रुपये प्राप्त झाल्याने मनुष्य स्वाधीन होत नाही, तर रुपयांच्या पराधीन होतो. कारण रुपये 'पर' आहेत. ॥ २३७ ॥

धन जवळ असले तरी मनुष्य संत होऊ शकतो. परंतु धनाची लालसा असेल तर मनुष्य संत होऊ शकत नाही ॥ २३८ ॥

धन प्राप्त झाल्याने दारिद्र्य नाहीसे होत नाही, तर धनाच्या इच्छेचा त्याग केल्याने नाहीसे होते. ॥ २३९ ॥

मनुष्याची इज्जत धन वाढल्यामुळे होत नाही तर धर्म वाढल्यामुळे होते ॥ २४० ॥

धनापेक्षा वस्तू श्रेष्ठ आहे, वस्तूपेक्षा मनुष्य श्रेष्ठ, मनुष्यापेक्षा विवेक श्रेष्ठ आहे आणि विवेकापेक्षाही सत्-तत्त्व (परमात्मा) श्रेष्ठ आहे. मनुष्य-जन्म त्या सत् तत्त्वाला प्राप्त करण्यासाठीच आहे. ॥ २४१ ॥

## (१८) नामजप

जर साधकाला काही समजत नसेल तर त्याने भगवंताला शरण होऊन भगवन्नाम-जपाचा आरंभ केलाच पाहिजे. ॥ २४२ ॥

भगवन्नामाचा जप आणि कीर्तन-दोन्ही कलियुगापासून रक्षण करून उद्धार करणारे आहेत. ॥ २४३ ॥

नामजपात प्रगती होण्याची ही ओळख आहेक की, नामजप खंडीत होऊ नये. ॥ २४४ ॥

नामजपात रुची नामजप करण्यानेच होते. ॥ २४५ ॥

नामजप अभ्यास नाही, तर धावा आहे. अभ्यासात शरीर-इंद्रिये-मन यांची प्रधानता असते तर धाव्यात स्वयंची प्रधानता असते ॥ २४६ ॥

नामजप सर्व साधनांना पोषक आहे. ॥ २४७ ॥

भगवन्नाम सर्वांसाठी खुले आहे आणि जीभ आपल्या मुखात आहे. असे असूनही नरकात जातात—ही फार मोठी आश्चर्याची

गोष्ट आहे!॥ २४८ ॥

भगवंताचे होऊन नाम घेण्याजे जे माहात्म्य आहे, ते केवल नाम घेण्याचे नाही. कारण नामजपात नामीचे (भगवंताचे) प्रेम मुख्य आहे. उच्चारण (क्रिया) मुख्य नाही.॥ २४९ ॥

(जपाच्या) संख्येकडे वृत्ती राहिल्याने निर्जीव जप होतो आणि भगवंताकडे वृत्ती राहिल्याने सजीव जप होतो. म्हणून जप आणि कीर्तनात क्रियेची मुख्यता न राहता प्रेमभावाची मुख्यता रहावी की, आपण आपल्या प्रियतमाचे नाम घेत आहोत!॥ २५० ॥

भगवंताचे कोणाते नाम-रूप श्रेष्ठ आहे-ही परीक्षा न करता साधकाने स्वतःची परीक्षा करावी की मला कोणते नाम आणि रूप अधिक प्रिय आहे.॥ २५१ ॥

## (१९) पाप आणि पुण्य

कोणी आपला अपकार करत असेल तर त्याच्याकडून वस्तुतः आपला उपकारच होत असतो. कारण त्याच्या अपकाराने आपले पाप नाहीसे होते॥ २५२ ॥

दुसऱ्यांचे वाईट करण्याने तर पाप लागतेच, वाईट ऐकण्याने आणि सांगण्यानेही पाप लागते.॥ २५३ ॥

स्वतःच्या कल्याणाची तीव्र इच्छा झाल्यावर साधकाचे पाप नष्ट होते॥ २५४ ॥

भगवंताशी विमुख होऊन संसाराशी सम्मुख होण्यासारखे कोणतेही पाप नाही.॥ २५५ ॥

आता मी पुन्हा पाप करणार नाही—हे पापाचे खरे प्रायश्चित्त आहे.॥ २५६ ॥

मनुष्य जन्मात केलेली पापे नरक आणि चौऱ्यांशी लक्ष योनी

भोगूनही समाप्त होत नाहीत तर शिल्लक राहतात आणि जन्म मरणाला कारण होतात॥ २५७॥

जेव्हा मनुष्य अनुकूलतेपासून सुखी आणि प्रतिकूलतेपासून दुःखी होतो, तेव्हाच तो पाप-पुण्याने बांधला जातो.॥ २५८॥

नाशवानाला महत्त्व देणे हेच बंधन आहे. यातूनच सर्व पापे उत्पन्न होतात.॥ २५९॥

जर सुखाची इच्छा असेल तर पाप करण्याची इच्छा नसतानाही पाप होईल. सुखाची इच्छा ही पाप करण्यास शिकविते. म्हणून पापांसून मुक्ती व्हावी अशी इच्छा असेल तर सुखाच्या इच्छेचा त्याग करा.॥ २६०॥

जेथे दुसऱ्यांना दुःख देण्याची आणि आपला स्वार्थ सिद्ध करण्याची नीयत असते तेथे पाप लागते आणि बंधन होते॥ २६१॥

लपविल्याने पाप आणि पुण्य—दोन्ही विशेष फल देणारे होतात. म्हणून आपले पाप प्रकट करावे परंतु पुण्य प्रकट करू नये— ***छीजहिं निसिचर दिनु अरु राती। निज मुख कहें सुकृत जेहि भाँती॥*** (मानस; लंका० ७२। २)॥ २६२॥

कोणत्याही व्यक्तीला भगवंताकडे सम्मुख करण्यासारखे कोणतेही पुण्य नाही, कोणतेही दान नाही.॥ २६३॥

मला सुख मिळावे—हे सर्वपापांचे मूळ आहे.॥ २६४॥

अगोदर पाप करून घेऊ नंतर प्रायश्चित्त करू—अशाप्रकारे जाणून बुजून केलेले पाप प्रायश्चित्ताने नष्ट होत नाहीत.॥ २६५॥

## ( २० ) पारमार्थिक मार्ग

प्रत्येक मनुष्याला भगवंताकडे जावेच लागेल, मग तो आज

जावो अथवा अनेक जन्मानंतर जावो, तर मग उशीर का ? ॥ २६६ ॥

खऱ्या अंत:करणाने भगवंतात तल्लीन झाल्यास साधकाला भूत, भविष्य, आणि वर्तमान तिन्ही काळातीत सर्वसंतांची प्रसन्नता, कृपा प्राप्त होते ॥ २६७ ॥

जेव्हा साधक स्वयं भगवंतात तन्मय होतो तेव्हा त्याचे मन-बुद्धी भगवंतात आपोआप लागतात, त्यांना लावावे लागत नाही. ॥ २६८ ॥

पारमार्थिक मार्गात साधकास सांसारिक अनुकूलता (धन, मान, सन्मान, आराम इत्यादी) तोपर्यंतच बाधक प्रतीत होतात, जोपर्यंत त्याचात सांसारिक सुखाची थोडीशी इच्छा अथवा रुची विद्यमान आहे. ॥ २६९ ॥

सांसारिक सिद्धी-असिद्धीत खुष-नाखुष होणारा मनुष्य पारमार्थिक मार्गात तत्परतेने चालू शकत नाही. ॥ २७० ॥

पारमार्थिक मार्गात राग-द्वेष हेच साधकाच्या साधन संपत्तीला लुटणारे मुख्य शत्रु आहेत. ॥ २७१ ॥

कोणत्याही प्रकाराने का होईना, भगवंतात तल्लीन व्हा. मग भगवान् आपोआप सांभाळतील. ॥ २७२ ॥

परमात्म्याचा मार्ग अवलंब करण्याने सांसारिक कार्यसुद्धा (व्यवहारसुद्धा) योग्य रीतीने होईल. परंतु संसाराचा मार्ग अवलंब केल्यास पारमात्म्याची प्राप्ती होणार नाही. ॥ २७३ ॥

स्वत:ला परमात्म्यात भेदभावाने लावा अथवा अभेदभावाने लावा, परिणाम एकच होईल. ॥ २७४ ॥

सांसारिक कार्यात तर नफा आणि तोटा दोन्ही होते. परंतु भगवंतासाठी केलेल्या कार्यात नफाच नफा होतो, तोटा होतच नाही. ॥ २७५ ॥

सांसारिक काम करणाऱ्याचा कोणीही साथी होत नाही, परंतु

भगवंतात लागणाऱ्याचे सर्वसाथी होतात. ॥ २७६ ॥

स्वार्थी माणूस पारमार्थिक मार्गातसुद्धा आपला स्वार्थच सिद्ध करतो आणि पारमार्थिक साधक सांसारिक व्यवहारातसुद्धा आपला परमार्थच सिद्ध करतो. ॥ २७७ ॥

सांसारिक इच्छा उत्पन्न होताच पारमार्थिक मार्ग अंधुक होतो. जर या अवस्थेत सावधानी बाळगली नाही तर इच्छा अधिक वाढते. इच्छा वाढल्यावर तर पारमार्थिक मार्गात अंधारच होतो. ॥ २७८ ॥

ज्या दिवशी सांसारिक रुची समाप्त होईल, त्याच दिवशी पारमार्थिक रुचीची पूर्ती होईल ॥ २७९ ॥

सांसारिक विषयात असंतोष करण्याने पतन होते आणि पारमार्थिक विषयात असंतोष करण्याने उत्थान होते. ॥ २८० ॥

संसारात करण्याने उन्नती होते, परंतु पारमार्थिक मार्गात न करण्याने उन्नती होते. ॥ २८१ ॥

संसारात लागल्याने पतनही शिल्लक राहते, उत्थानही शिल्लक राहते. परंतु भगवंतात लागल्याने पतन तर होत नाही, उत्थान शिल्लक राहत नाही. ॥ २८२ ॥

## ( २१ ) प्रारब्ध

प्रारब्ध चिंता नाहीशी करण्यासाठी आहे, निष्क्रिय बनविण्यासाठी नव्हे. ॥ २८३ ॥

मनुष्य प्रारब्धानुसार पाप-पुण्य करीत नाही. कारण कर्माचे फल कर्म होत नाही, तर भोग होतो. ॥ २८४ ॥

प्रारब्धाचे काम तर केवळ सुखदायी-दुःखदायी परिस्थिति निर्माण करणे आहे. परंतु त्यात सुखी-दुःखी होण्यात अथवा न

होण्यात सर्व मानव स्वतंत्र आहेत. ॥ २८५ ॥

सर्वज्ञ, सर्वसुहृद, सर्वसमर्थ प्रभूचे असे विधान आहे की, त्याच्या पापपेक्षा अधिक दंड कोणालाही भोगावा लागत नाही आणि जो दंड मिळतो तो त्याच्या कोणत्या ना कोणत्या पापाचेच फल असते. ॥ २८६ ॥

जे होते ते चांगलेच होत असते, वाईट होतच नाही. म्हणून करण्यात सावधान आणि होण्यात प्रसन्न राहिले पाहिजे. ॥ २८७ ॥

शास्त्रनिषिद्ध आचरण प्रारब्धाने होत नाहीत, तर कामनेने होते ॥ २८८ ॥

एक 'करणे' असते आणि एक 'होणे' असते. दोघांचा विभाग वेगवेगळा आहे. 'करणे' पुरुषार्थाच्या अधीन आहे आणि 'होणे' प्रारब्धाधीन आहे. म्हणून मनुष्य करण्यात (कर्तव्यात) स्वाधीन आहे आणि होण्यात (फलप्राप्तीत) पराधीन आहे. ॥ २८९ ॥

## ( २२ ) प्रेम

संसारातून आसक्ती सर्वथा हटताच भगवंतात अनुराग (प्रेम) होतो. ॥ २९० ॥

जी वस्तू आपली असते ती नेहमीसाठी आपल्याला आवडते. म्हणून एकमात्र भगवंताला आपले मानल्यावर भगवंतात प्रेम प्रकट होते. ॥ २९१ ॥

किती आश्चर्याची गोष्ट आहे की, जो नित्य-निरंतर विद्यमान राहतो, तो (परमात्मा) तर प्रिय वाटत नाही. परंतु जो नित्य-निरंतर बदलत आहे तो (संसार) प्रिय लागतो. ॥ २९२ ॥

जोपर्यंत संसारात आसक्ती आहे, तोपर्यंत भगवंतात खरे प्रेम नाही. ॥ २९३ ॥

संसाराची सुखासक्तीच भगवत्प्रेमात खास बाधक आहे. जर सुखासक्तीचा त्याग केला तर भगवंतात आपोआप प्रेम जागृत होईल. ॥ २९४ ॥

जोपर्यंत नाशवानाकडे ओढ राहील तोपर्यंत साधन करीत असूनही अविनाशीकडे ओढ (प्रेम) होणार नाही आणि त्याचा अनुभव होणार नाही. ॥ २९५ ॥

भगवंतात अनन्यप्रेम होण्याचे नाव राधातत्त्व आहे. जोपर्यंत संसारात आकर्षण राहते तोपर्यंत राधातत्त्व अनुभवात येत नाही. ॥ २९६ ॥

भगवंतात प्रेम होणे, यासारखे कोणतेही भजन नाही. ॥ २९७ ॥

जोपर्यंत साधक आपल्या मनातील इच्छेची पूर्ती करू पाहील, तोपर्यंत त्याचे सगुणातही प्रेम होणार नाही आणि निर्गुणातही! ॥ २९८ ॥

भगवप्रेम यज्ञ, तप, दान, व्रत, तीर्थ इत्यादीपासून प्राप्त होत नाही, तर भगवंतात दृढ आत्मीयता करण्याने प्राप्त होते. ॥ २९९ ॥

तपश्चर्येने प्रेम प्राप्त होत नाही, तर शक्ती प्राप्त होते. प्रेम, भगवंतात आत्मीयता झाल्याने प्राप्त होते. ॥ ३०० ॥

भगवत्प्रेमात जो विलक्षण रस आहे, तो ज्ञानात नाही. ज्ञानात अखंड आनंद आहे, परंतु प्रेमात अनंत आनंद आहे. ॥ ३०१ ॥

भेद मतात होतो, प्रेमात नाही. प्रेम संपूर्ण मतवाद्यांना खाते ॥ ३०२ ॥

भगवंताकडे ओढ असण्याचे नाव भक्ती आहे. भक्ती कधी पूर्ण होत नाही, तर उत्तरोत्तर वाढतच राहते. ॥ ३०३ ॥

भगवंतात प्रेम होण्यासाठी त्यांच्यात दृढ आत्मीयतेची जरूरी आहे आणि त्यांच्या दर्शनासाठी उत्कट अभिलाषेची जरूरी आहे. ॥ ३०४ ॥

संसाराला जाणाल तर त्यापासून वैराग्य होईल आणि परमात्म्याला जाणाल तर त्यांच्यात प्रेम होईल. ॥ ३०५ ॥

ज्याची प्राप्ती अवश्यंभावी आहे, त्या परमात्म्यावर प्रेम करा आणि ज्याचा वियोग अवश्यंभावी आहे, त्या संसाराची सेवा करा. ॥ ३०६ ॥

प्रेम तेथे होते, जेथे आपल्या स्वतःच्या सुखाचा आणि स्वार्थाचा गंधही नाही. ॥ ३०७ ॥

प्रेम मुक्तीच्याही वरची गोष्ट आहे. मुक्तीपर्यंत तर जीव रसाचा अनुभव करणारा असतो, परंतु प्रेमात तो रसाचा दाता बनतो. ॥ ३०८ ॥

ज्ञानमार्गात दुःख, बंधन समाप्त होते आणि स्वरूपात स्थिती होते. परंतु मिळत काही नाही, भक्तिमार्गात मात्र प्रतिक्षण वाढणारे प्रेम प्राप्त होते. ॥ ३०९ ॥

ज्ञानाविना प्रेम मोहात परिणत होते आणि प्रेमाविना ज्ञान शून्यतेत जाते ॥ ३१० ॥

ज्याच्या अंतःकरणात भक्तीचे संस्कार आहेत आणि कृपेचा आश्रय आहे, त्याला मुक्तीत संतोष होत नाही. भगवंताची कृपा त्याच्या मुक्तीच्या रसाला नीरस करते आणि प्रेमाचा अनंतरस प्रदान करते. ॥ ३११ ॥

आपल्या मताचा आग्रह आणि दुसऱ्या मताची उपेक्षा, खंडन, अनादर केला नाही तर मुक्तीनंतर भक्तीची (प्रेमाची) प्राप्ती आपोआप होते. ॥ ३१२ ॥

भोगेच्छेचा अंत होतो आणि मुमुक्षा व जिज्ञासा यांची पूर्ती होते. परंतु प्रेम-पिपासा हिचा अंतही होत नाही आणि पूर्तीही होत नाही, तर ती प्रतिक्षण वाढतच राहते. ॥ ३१३ ॥

संसारात आकर्षण आणि विकर्षण (रुची-अरुची) दोन्ही होतात. परंतु परमात्म्यात आकर्षण-च-आकर्षण होते, विकर्षण होतच नाही. जर विकर्षण होत असेल तर वास्तविक आकर्षण झालेच नाही. ॥ ३१४ ॥

जसे सांसारिक दृष्टीने लोभरूप आकर्षणाविना धनाचे विशेष महत्त्व नाही, तसेच प्रेमाविना ज्ञानाचे विशेष महत्त्व नाही, त्यात शून्यवाद येऊ शकतो. ॥ ३१५ ॥

## ( २३ ) मोठेपणा

उत्पन्न आणि नष्ट होणाऱ्या वस्तूंच्या अनुषंगाने स्वत:ला मोठे अथवा छोटे मानणे फार मोठी चूक आहे, तुच्छता आहे. ॥ ३१६ ॥

स्वत:ला छोटे आणि दुसऱ्याला मोठे मानणे हा खरा मोठेपणा आहे. स्वत:ला मोठे आणि दुसऱ्याला छोटे मानणे ही खरी नीचता आहे. ॥ ३१७ ॥

वास्तविक मोठा तोच आहे, जो दुसऱ्यांना मोठा बनवितो. जो दुसऱ्यांना लहान बनविण्याचा प्रयत्न करतो तो स्वत: लहान आहे, दास आहे. ॥ ३१८ ॥

धन, जमीन, घर इत्यादी जड वस्तूंच्या संबंधाने आपल्याला मोठे मानणे बुद्धी भ्रष्ट झाल्याचे लक्षण आहे. ॥ ३१९ ॥

सांसारिक पदार्थांच्या अनुषंगाने जो स्वत:ला मोठे मानतो, त्याला हे सांसारिक पदार्थ तुच्छ बनवितात. ॥ ३२० ॥

पूर्वी आम्ही मोठे होतो, मग आम्ही धन कमावले. आता त्या धनामुळे स्वत:ला मोठे मानू लागला. वास्तविक धन मोठे झाले, आम्ही छोटे झालो! धनाची इज्जत झाली, आमची फजिती झाली. ॥ ३२१ ॥

# ( २४ ) बन्धन आणि मुक्ती

शरीरादी सांसारिक पदार्थांना आपले मानणे हेच बन्धन आहे आणि आपले न मानणे हीच मुक्ती आहे. मानणे अथवा न मानणे यात सर्वचे सर्व स्वतंत्र आहेत. ॥ ३२२ ॥

संसारातील सर्व संबंध मुक्त करणारेही आहेत आणि बांधणारेही! केवळ परमार्थकरण्यासाठी (सेवा करण्यासाठी) मानलेला संबंध मुक्त करणारा आणि स्वार्थासाठी मानलेला संबंध बांधणारा होतो. ॥ ३२३ ॥

मानवशरीराचा दुरुपयोग केल्याने जीव बांधला जातो आणि सदुपयोग केल्याने मुक्त होतो. आपल्या स्वार्थासाठी दुसऱ्यांचे अहित करणे मानवशरीराचा दुरुपयोग आहे आणि आपल्या स्वार्थाचा त्याग करून दुसऱ्यांचे हित करणे त्याचा सदुपयोग आहे. ॥ ३२४ ॥

नाशवानाला महत्त्व देणे हेच बंधन आहे. ॥ ३२५ ॥

प्राप्त झालेल्याला आपले मानू नका, मग मुक्ती स्वतःसिद्ध आहे. ॥ ३२६ ॥

अनुकूलता-प्रतिकूलता हाच संसार आहे. अनुकूलता-प्रतिकूलता यात खुष-नाखुष झाल्याने मनुष्य बांधला जातो आणि खुष-नाखुष न झाल्यास मुक्त होतो. ॥ ३२७ ॥

शरीर संसाराचा अंश आहे आणि आपण (स्वयं) परमात्म्याचे अंश आहोत. म्हणून शरीराला संसाराला अर्पित करा अर्थात् संसाराच्या सेवेत लावा आणि स्वयंला परमात्म्याला अर्पित करा. मग आजच मुक्ती आहे! ॥ ३२८ ॥

मुक्तीची इच्छा झाल्यावर शरीराच्या राहण्याची इच्छा राहत

नाही. जर राहत असेल तर मुक्तीची इच्छा च नाही! ॥ ३२९ ॥

निष्कामभावपूर्वक (दुसऱ्यांसाठी) कर्म करण्याने मुक्ती होते आणि सकामभावपूर्वक (आपल्यासाठी) कर्म करण्याने बन्धन होते. म्हणून मनुष्याने निष्कामभावपूर्वक आपल्या कर्तव्याचे पालन केले पाहिजे. ॥ ३३० ॥

संसार-बन्धनातून मुक्त व्हायचे असेल तर प्राप्त वस्तूंच्या ममतेचा आणि अप्राप्त वस्तूंच्या कामनेचा त्याग करा. ॥ ३३१ ॥

भगवंताने निर्माण केलेली सृष्टी कधी बांधत नाही, दु:ख देत नाही. जीवाने निर्माण केलेली सृष्टी (अहंता-ममता) हीच बांधते आणि दु:ख देते. ॥ ३३२ ॥

जे करायला नको ते करणे आणि जे करू शकत नाही त्याचे चिंतन करणे—ही दोन खास बंधने आहेत. ॥ ३३३ ॥

वस्तूचे प्राप्त होणे अथवा प्राप्त न होणे बन्धनकारक नाही, तर वस्तूशी मानलेला संबंधच बन्धनकारक आहे. ॥ ३३४ ॥

संसाराला आपल्या सेवेसाठी मानणे बन्धनाचे कारण आहे आणि आपल्याला संसाराच्या सेवेसाठी मानणे मुक्तीचे कारण आहे. ॥ ३३५ ॥

बन्धन क्रियेने होत नाही, तर कामनेने होते. ॥ ३३६ ॥

अप्राप्त वस्तूची इच्छा आणि प्राप्त वस्तूची ममता हेच बंधन आहे, हीच परतन्त्रता आहे. ॥ ३३७ ॥

भोगांच्या इच्छेचा त्याग करण्यासाठी मुक्तीची इच्छा करणे आवश्यक आहे. परंतु मुक्तीची प्राप्ती होण्यासाठी मुक्तीची इच्छा करणे बाधक आहे. ॥ ३३८ ॥

मनुष्य कर्मांनी बांधला जात नाही, तर कर्मात तो जो आसक्ती

आणि स्वार्थभाव ठेवतो, त्यापासूनच बांधला जातो. ॥ ३३९ ॥

कोणत्याही कर्माशी स्वार्थाचा संबंध जोडल्याने ते कर्म तुच्छ आणि बन्धनकारक होते. ॥ ३४० ॥

असा सिद्धान्त आहे की, जोपर्यंत मनुष्य आपल्यासाठी कर्म करतो, तोपर्यंत त्याच्या कर्माची समाप्ती होत नाही आणि तो कर्मांनी बांधलाच जातो. ॥ ३४१ ॥

जोपर्यंत प्रकृतीशी संबंध आहे, तोपर्यंत कर्मकरणे अथवा न करणे—दोन्हीही 'कर्म' बन्धनकारक आहेत. ॥ ३४२ ॥

मुक्ती स्वयंची होते, शरीराची नव्हे. म्हणून मुक्त झाल्यावर शरीर संसारापासून वेगळे होत नाही, तर स्वयं शरीर-संसारापासून वेगळे होते ॥ ३४३ ॥

मुक्ती बाह्य त्यागाने होत नाही, तर अंत:करणातील वैराग्याने होते. ॥ ३४४ ॥

मला काही नकोच—केवळ इतक्याशा गोष्टीने मुक्ती होते. ॥ ३४५ ॥

मुक्ती सहज-स्वाभाविक आहे, बन्धन कृति साध्य आहे. ॥ ३४६ ॥

वास्तविक मुक्तच मुक्त होतो, बद्ध मुक्त होत नाही. ॥ ३४७ ॥

## ( २५ ) वाईटपणाचा त्याग

साधकासाठी हे आवश्यक आहे की, त्याने कोणाला वाईट समजू नये, कोणाचे वाईट करू नये, कोणाबद्दल वाईट विचार करू नये, कोणात दोष पाहू नये, कोणाची निंदा ऐकू नये आणि कोणाचा दोष सांगू नये. या सहा गोष्टींचे दृढ़तापूर्वक पालन करण्याने साधक दोष-रहित होईल. ॥ ३४८ ॥

कोणी अपकार केला तर त्याच्या मोबदल्यात त्याचे वाईट न इच्छिता हे समजावे की, आपल्याच दाताने आपली जीभ चावली गेली! ॥ ३४९ ॥

चांगले करण्याची तितकी आवश्यकता नाही, जितके वाईटाचा त्याग करण्याची आवश्यकता आहे. वाईटाचा त्याग करण्याने चांगलेपणा आपोआपच येईल, करावा लागणार नाही. ॥ ३५० ॥

ज्याला आपण उत्तम समजतो, ते सर्वचे सर्व पालन करण्याची जबाबदारी आपल्यावर नाही. परंतु ज्याला आपण वाईट समजतो, त्याचा सर्वतोपरी त्याग करण्याची जबाबदारी आपल्यावर आहे आणि त्याच्या त्यागाचे बल, योग्यता, ज्ञान, सामर्थ्यसुद्धा भगवंताने आपल्याला दिले आहे. ॥ ३५१ ॥

वीरता चांगले करण्यात नाही, तर कोणाचेही वाईट न करण्यात आहे. ॥ ३५२ ॥

जो स्वतःच्या कल्याणाचा इच्छुक आहे, त्याने कोणाविषयीही वाईट भावना करू नये. ॥ ३५३ ॥

दुसऱ्यांविषयी आपली वाईट भावना झाल्यास त्याचे वाईट होईल का नाही हे तर निश्चित सांगता येत नाही. परंतु आपले अंतःकरण तर मलिन होईलच. ॥ ३५४ ॥

लक्षात ठेवा! कोणाचेही वाईट कराल तर त्याचे वाईट होणार असेल तरच होईल. परंतु तुमचे नवीन पाप होईलच. ॥ ३५५ ॥

चांगले करण्याने सीमित चांगुलपणा होतो. परंतु वाईट पणाचा त्याग केल्याने असीम चांगुलपणा होतो. ॥ ३५६ ॥

चागले बनण्यासाठी आपल्याला काही करण्याची जरूरी नाही. केवळ वाईटपणाचा सर्वथा त्याग केला तर आपण चांगले होऊ. ॥ ३५७ ॥

## ( २६ ) भक्त

भगवद्भक्ता द्वारा कर्म होत नाहीत, तर त्याच्याद्वारा प्रत्येक क्षणी

पूजा होते. कारण प्रत्येक कर्मात त्याचा पूजेचा भाव असतो ॥ ३५८ ॥

ज्याचे मन भगवंतात लागून राहते, त्याला सामान्य माणूस समजु नये. कारण तो भगवंताच्या दरबारातला सदस्य असतो. ॥ ३५९ ॥

जसे लोभी माणसाची दृष्टी धनावरच राहते, तसेच भक्ताची दृष्टी भगवंतावरच राहिली पाहिजे. ॥ ३६० ॥

देवतालोक आपल्या उपासकांना (त्यांची उपासना सांगोपांग झाल्यावर) त्यांच्या हित-अहिताचा विचार न करता त्यांना इच्छित वस्तू प्रदान करतात. परंतु परमपिता भगवान् आपल्या भक्तांना स्वतःच्या इच्छेने त्याच वस्तू देतात, ज्यात त्यांचे परम हित असते. ॥ ३६१ ॥

तुम्ही भगवंताचे दास झालात तर भगवान् तुम्हाला मालक बनवतील. ॥ ३६२ ॥

भगवंताचा भक्त कितीही नीच जातीचा असला तरी तो भक्तिहीन ब्राह्मणपेक्षा ही श्रेष्ठ आहे. ॥ ३६३ ॥

भगवंताच्या हृदयात भक्ताचा जितका आदर आहे, तितका आदर करणारा संसारात दुसरा कोणीही नाही. ॥ ३६४ ॥

ज्या भक्ताला आपल्यात काहीही विशेषता दिसत नाही, आपल्यात कोणत्याही गोष्टीचा अभिमान होत नाही, त्या भक्तात भगवंताची विलक्षणता उतरते. ॥ ३६५ ॥

शरणागत भक्ताला भजन करावे लागत नाही, तर त्याच्याद्वारा आपोआप स्वाभाविक भजन होते. ॥ ३६६ ॥

भक्त भगवंताला ज्या रूपात पाहू इच्छितो, भगवान् त्याच्या भावानुसार तसेच बनतात. ॥ ३६७ ॥

भगवद्भक्ताला देवता म्हणणे ही त्याची निंदा आहे. कारण त्याचा दर्जा देवतापेक्षाही फार उच्च असतो. ॥ ३६८ ॥

प्रेमी भक्त भगवंताच्या प्रभावाने आकृष्ट होत नाहीत तर भगवंताच्या आत्मीयतेने आकृष्ट होतात. ॥ ३६९ ॥

प्रेमीची गोष्ट प्रेमीच समजू शकतो, ज्ञानी नव्हे. मग अज्ञानी तर कसा समजू शकेल? ॥ ३७० ॥

भक्ताला भगवंताच्या सेवेत आनन्द येतो आणि भगवंताला भक्ताच्या सेवेत आनंद येतो. ॥ ३७१ ॥

## ( २७ ) भगवान्

एक भगवत्तत्त्व अथवा परमात्मतत्त्व हेच वास्तविक तत्त्व आहे. त्याच्याशिवाय सर्व अतत्त्व आहेत. ॥ ३७२ ॥

जोपर्यंत अंत:करणात संसाराचे महत्त्व आहे, तोपर्यंत भगवंताचे महत्त्व समजू शकत नाही. ॥ ३७३ ॥

भगवंताला मन-बुद्धी-इंद्रियांनी नव्हे, तर स्वयंनेच जाणले जाऊ शकते. ॥ ३७४ ॥

आपण ज्या वस्तूला दूराती दूर मानतो, त्यापेक्षाही शरीर जास्त दूर आहे आणि ज्या वस्तूला जवळाती जवळ मानतो, परमात्मा त्यापेक्षा ही अत्यंत जवळ आहेत. ॥ ३७५ ॥

प्राप्त होणारी प्रत्येक वस्तू आपल्यापासून वेगळी होणारी असते, परंतु जे नित्य प्राप्त परमात्मतत्त्व आहे, ते कधीही कोणत्याही अवस्थेत वेगळे होत नाही. मग आपणाला त्याचा अनुभव होवो अथवा न होवो. ॥ ३७६ ॥

संसार अभावरूपच आहे. भावरूपाने केवळ एक अक्रिय तत्त्व परमात्माच आहे, ज्याच्या सत्तेने अभावरूप संसारसुद्धा सत्तावान् प्रतीत होत आहे. ॥ ३७७ ॥

आपण 'असणे'-पणाला (सत्तेला) परमात्म्याचे न मानता

संसाराचे मानतो—हीच चूक आहे. ॥ ३७८ ॥

संसारात कोणी ही नोकराला मालक बनवित नाहीत. परंतु भगवान् शरणागत भक्ताला आपले मालक बनवितात! अशी उदारता केवळ प्रभूतच आहे. ॥ ३७९ ॥

एका भगवंताशिवाय अशी कोणतीच गोष्ट नाही, जी सदा आपल्याबरोबर राहील आणि आपण तिच्याबरोबर राहू. ॥ ३८० ॥

प्रतिक्षण बदलणाऱ्या संसारावर असणारा विश्वास हाच भगवंतावर विश्वास होऊ देत नाही. ॥ ३८१ ॥

जसे सूर्य प्रकट होतो, उत्पन्न होत नाही, तसेच अवतारसमयी भगवान् प्रकट होतात, आपल्याप्रमाणे जन्मत नाहीत. ॥ ३८२ ॥

परमात्मा आहे-एवढे मानणे पर्याप्त आहे. परमात्मा कसे आहेत—हे जाणण्याची जरूरी नाही. ॥ ३८३ ॥

भगवान् सर्वसमर्थ असूनही आपल्यापासून दूर होण्यात असमर्थ आहेत. ॥ ३८४ ॥

भगवान् कुठे आहेत? भगवान् तेथे आहेत जेथे 'कुठे-येथे-तेथे' नाहीत अर्थात् भगवान् देश, काल, वस्तू, व्यक्ती इत्यादीपासून सर्वथा अतीत आहेत. ॥ ३८५ ॥

भगवान् सर्व ठिकाणी विराजमान आहेत. परंतु ग्राहक पाहिजे. खांब कित्येक आहेत, परंतु प्रह्लाद पाहिजे. ॥ ३८६ ॥

भगवंताचा कुठेही अभाव नाही. केवळ त्यांना पाहणाऱ्यांचा अभाव आहे ॥ ३८७ ॥

ज्याची दृष्टी संसारावर राहते, तो म्हणतो की, भगवान् कुठे आहेत' आणि ज्याची दृष्टी भगवंतावर राहते, तो म्हणतो की, 'भगवान् कुठे नाहीत?' ॥ ३८८ ॥

जसे सूर्य ढगांनी आच्छादित होत नाही, तर आपले नेत्रच ढगांनी आच्छादित होतात, तसेच परमात्मा आवृत्त होत नाहीत, आपली बुद्धीच आवृत्त होते. ॥ ३८९ ॥

भगवान् जीवाला आपला दास (गुलाम) बनवू इच्छित नाहीत, तर सखा (आपल्यासारखे) बनवू इच्छितात. ॥ ३९० ॥

सत् असत् चा विरोधी नाही, तर त्याला सत्ता देणारा आहे. सत्ची जिज्ञासा हीच असत्ची विरोधी आहे. ॥ ३९१ ॥

सत् विना असत्ला पाहू शकत नाही आणि असत् विना सत्चे वर्णन करू शकत नाही. ॥ ३९२ ॥

परमात्मतत्त्वाचे वर्णन होत नाही, तर अनुभव होतो. ॥ ३९३ ॥

परमात्म तत्त्वाशिवाय इतराची जितकी स्वीकृती आहे तितकेच अज्ञान आहे. ॥ ३९४ ॥

जगन्नाथ भगवान् असताना आपल्याला अनाथ मानणे चूक आहे ॥ ३९५ ॥

मनुष्याने ईश्वरात केवळ विश्वासच केला पाहिजे. जर तो संसारात विश्वास आणि ईश्वरात विवेक लावील तर नास्तिक होईल. ॥ ३९६ ॥

साधकाला भगवंत प्रथम दूर दिसतात, नंतर जवळ दिसतात, त्यानंतर आपल्यात दिसतात, मग केवळ भगवान्च दिसतात. ॥ ३९७ ॥

परमात्म्यात जीव आहे आणि जीवात जगत् आहे. म्हणून परमात्म्याची तर स्वतंत्र सत्ता आहे. परंतु जीव आणि जगताची स्वतंत्र सत्ता नाही. ॥ ३९८ ॥

संपूर्ण देश, काल, क्रिया, वस्तू, व्यक्ती, अवस्था, परिस्थिती, घटना इत्यादीचा अभाव झाल्यावरही जे शिल्लक राहते तेच

परमात्मतत्त्व आहे. ॥ ३९९ ॥

## ( २८ ) भगवत्कृपा

जसे गायीचे दूध गायीसाठी नाही, तर दुसऱ्यांसाठीच आहे, तसेच भगवंताची कृपा भगवंतासाठी नाही, तर दुसऱ्यांसाठीच (आपल्या सर्वांसाठीच) आहे. ॥ ४०० ॥

जर भगवंताकडून दया इच्छित असाल तर आपल्यापेक्षा लहानांवर दया करा, मग भगवान् दया करतील. दया इच्छिता परंतु करीत नाही—हा अन्याय आहे, आपल्या ज्ञानाचा तिरस्कार आहे. ॥ ४०१ ॥

जी गीता अर्जुनलाही दुसऱ्यावेळी ऐकायला मिळाली नाही, ती आपल्याला दररोज वाचण्या-ऐकण्यासाठी मिळत आहे—ही भगवंताची केवढी विलक्षण कृपा आहे. ॥ ४०२ ॥

आतापर्यंत जितके काही महात्मा झाले आहेत, ते भगवत्कृपेनेच जीवन्मुक्त, तत्त्वज्ञ आणि भगवत्प्रेमी झाले आहेत, आपल्या प्रयत्नाने नव्हे. ॥ ४०३ ॥

स्वत:सिद्ध असलेल्या परमपदाची प्राप्ती आपल्या कर्मांनी, आपल्या पुरुषार्थाने किंवा आपल्या साधनेने होत नाही. ही तर केवळ भगवत्कृपेनेच होते. ॥ ४०४ ॥

## ( २९ ) भगवत्प्राप्ती

अंत:करणापासून भगवंताला इच्छिणारा मनुष्य कोणत्याही वर्ण, आश्रम, सांप्रदाय, परिस्थिति इत्यादीत का असेना आणि कितीही पापी, दुराचारीका असेना, तो भगवत्प्राप्तीचा पूर्ण अधिकारी आहे. ॥ ४०५ ॥

साधकाने संसाराकडून कधीही आशा ठेवू नये. कारण तो

सदा राहत नाही आणि परमात्म्याकडून कधीही निराश होऊ नये. कारण त्यांचा कधी अभाव होत नाही. ॥ ४०६ ॥

भगवंताच्या विषयात संतोष करणे आणि सांसारिक विषयात असंतोष करणे महान् हानिकारक आहे. ॥ ४०७ ॥

जसा मासा पाण्याविना व्याकुळ होतो, तसेच आपण जर भगवंताविना व्याकुळ झालो तर भगवत्प्राप्तीला उशीर लागणार नाही. ॥ ४०८ ॥

भगवत्प्राप्ती झाल्यावर मग काही करणे, जाणणे आणि प्राप्त करणे शिल्लक राहत नाही. यातच मनुष्यजीवनाची पूर्णता, सफलता आहे. ॥ ४०९ ॥

साधकाने विचार करावा की, भगवान् सर्व देशात आहेत, म्हणून येथेही आहेत. सर्वकाळात आहेत, म्हणून आत्ताही आहेत. सर्वांत आहेत, म्हणून आपल्यातही आहेत. सर्वांचे आहेत, म्हणून माझेही आहेत. ॥ ४१० ॥

भगवत्प्राप्तीत व्याकुळतेने जितका लवकर लाभ होतो, तितका लवकर लाभ विचारपूर्वक केल्या गेलेल्या साधनेने होत नाही. ॥ ४११ ॥

स्वयंमध्ये तीव्र उत्कंठा नसल्यामुळेच भगवत्प्राप्तीत उशीर होत आहे. ॥ ४१२ ॥

खेळात लपलेल्या बालकाला दुसऱ्या बालकाने पाहिले तर तो पुढे येतो की, आता तर याने मला पाहिले, आता काय लपायचे? तसेच भगवान् सर्व ठिकाणी लपलेले आहेत. जर साधक सर्व ठिकाणी भगवंताला पाहू लागला तर मग भगवान् त्यापासून लपून राहणार नाहीत, समोर येतील. ॥ ४१३ ॥

सर्वांकडून विमुख झाल्यावर साधक स्वतःमध्येच आपल्या प्रियतम भगवंताला प्राप्त करतो. ॥ ४१४ ॥

भगवत्प्राप्तीचा सरळ उपाय क्रिया नाही, तर ओढ आहे. ॥ ४१५ ॥

भगवंतांनी आपल्या प्राप्तीसाठी जर जीवाला मनुष्यशरीर दिले आहे तर त्याबरोबरच त्याच्यासाठी पूर्ण योग्यता आणि सामुग्रीही दिली आहे. इतकी योग्यता आणि सामुग्री दिली आहे की, मनुष्य आपल्या जीवनात कितीतरी वेळा भगवत्प्राप्ती करू शकतो. ॥ ४१६ ॥

उत्कट अभिलाषेच्या उणीवेनेच परमात्मप्राप्तीत उशीर लागतो, प्रयत्नाच्या उणीवेने नव्हे. ॥ ४१७ ॥

परमात्म्याशी प्रत्येक वर्ण, आश्रम, जाती, सांप्रदाय इत्यादीचा समानरूपाने संबंध आहे. म्हणून जो जेथे आहे, तेथेच परमात्म्याला प्राप्त करू शकतो. ॥ ४१८ ॥

असत्‌चा आश्रय घेऊन असत् द्वारा सत् प्राप्त करण्याचा प्रयत्न करणे फार मोठी चूक आहे. ॥ ४१९ ॥

ज्याच्यासाठी मनुष्यशरीर मिळाले आहे, त्याची प्राप्ती कठीण आहे तर मग सुगम काय आहे? ॥ ४२० ॥

भगवंताच्या दर्शनासाठी काय करावे? भगवंताच्या नामाचा जप करावा आणि भगवंतांना प्रार्थना करावी की, 'हे नाथ! मी आपल्याला विसरू नये' तर मग यामुळे भगवंतात प्रेम होईल आणि प्रेम झाल्यामुळे भगवान् प्रकट होतील. ॥ ४२१ ॥

जोपर्यंत आपल्यासाठी काही तरी 'करणे' आणि 'मिळविणे' ही इच्छा राहते, तोपर्यंत नित्यप्राप्त परमात्मतत्त्वाचा अनुभव होऊ शकत नाही. ॥ ४२२ ॥

भगवत्प्राप्ती केवळ उत्कट अभिलाषेने होते. उत्कट अभिलाषा जागृत न होण्यात मुख्य कारण सांसारिक भोगांची कामनाच आहे. ॥ ४२३ ॥

सत्ययुग इत्यादीत मोठ-मोठ्या ऋषींना जे भगवान् प्राप्त झाले होते, तेच आज कलियुगातही सर्वांना प्राप्त होऊ शकतात. ॥ ४२४ ॥

भोगांची प्राप्ती नेहमीसाठी होत नाही आणि सर्वांसाठी होत नाही. परंतु भगवंताची प्राप्ती नेहमीसाठी होते आणि सर्वांसाठी होते. ॥ ४२५ ॥

परमात्म्याच्या प्राप्तीत भावाची प्रधानता आहे, क्रियेची नव्हे ॥ ४२६ ॥

भगवान् हट्ट केल्याने प्राप्त होत नाहीत तर प्रामाणिक लगन झाल्याने प्राप्त होतात. ॥ ४२७ ॥

परमात्मप्राप्तीत मनुष्याचे पारमार्थिक भाव, आचरण इत्यादीची मुख्यता आहे, जाती अथवा वर्ण याची मुख्यता नाही. ॥ ४२८ ॥

परमात्मप्राप्तीत विवेक, भाव आणि वैराग्य (आसक्तीचा त्याग) जितके मूल्यवान आहे, तितकी क्रिया मूल्यवान नाही. ॥ ४२९ ॥

जर प्रत्येक कियेचा आदि-अंत असतो तर मग त्याचे फल अनंत कसे होईल? म्हणून अनंत तत्त्व (परमात्मा) क्रियासाध्य नाही. ॥ ४३० ॥

परमात्मप्राप्तीची उत्कट अभिलाषा झल्याने एक विरहाग्नी उत्पन्न होतो, जो अनन्त जन्मांच्या पापांचा नाश करून परमात्मप्राप्ती करवितो. ॥ ४३१ ॥

परमात्मप्राप्तीची उत्कट अभिलाषा न होण्यात खास कारण आहे— सांसारिक सुखाची इच्छा, आशा आणि भोग. ॥ ४३२ ॥

कोणती वस्तू समानरूपाने सर्वांना मिळत असेल तर ती म्हणजे परमात्माच आहे. परमात्म्या शिवाय कोणतीही वस्तु समानरूपाने सर्वांना मिळू शकत नाही. ॥ ४३३ ॥

आपण परमात्म्याशिवाय ईतर काही प्राप्त करूच शकत

नाहीत. जे प्राप्त करू ते 'नाही' त जमा होईल. ॥ ४३४ ॥

परमात्मतत्त्वाचा अनुभव तेव्हाच होईल जेव्हा *'विषयभोग निद्रा हँसी जगतप्रीत बहु बात'*— हे पाचही आवडणार नाहीत. ॥ ४३५ ॥

साधकाला भगवत्प्राप्तीत उशीर होण्याचे कारण हेच आहे की, तो भगवंताचा विरह सहन करीत आहे. जर त्याला भगवंताचा वियोग असह्य झाला तर मग भगवत्प्राप्तीत उशीर होणार नाही. ॥ ४३६ ॥

जोपर्यंत असत्‌ची कामना, आश्रय, भरवसा आहे, तोपर्यंत सत्‌चा अनुभव होऊ शकत नाही. ॥ ४३७ ॥

परमात्मप्राप्ती वास्तविक सुगम आहे. परंतु लगन नसल्यामुळे कठीण आहे. ॥ ४३८ ॥

भगवान् क्रियाग्राही नाहीत, तर भावग्राही आहेत— '**भावग्राही जनार्दनः**'। म्हणून भावानेच (अनन्यभक्तीनेच) दर्शन देतात, क्रियेने नाही. ॥ ४३९ ॥

अनित्य वस्तूशी संबंध-विच्छेद झाल्यावर नित्य तत्त्व आपोआप अनुभवात येते. ॥ ४४० ॥

सर्वमानव भगवत्प्राप्तीचे अधिकारी आहे आणि ते प्रत्येक परिस्थितीत भगवंताला प्राप्त करू शकतात! ॥ ४४१ ॥

परमात्मप्राप्तीस उशीर लागत नाही. उशीर लागतो— संबंधजन्य सुखाच्या इच्छेचा त्याग करण्यात. ॥ ४४२ ॥

केवळ भगवंताची इच्छा असेल तर भगवान् प्रकट होतील किंवा कोणतीच इच्छा नसेल तरी भगवान् प्रकट होतील. अधूरेपणा नसला पाहिजे ॥ ४४३ ॥

सत्‌ला जाणा किंवा न जाणा, परंतु ज्याला असत् जाणता त्याचा त्याग करा. म्हणजे सत्‌ची प्राप्ती होईल. ॥ ४४४ ॥

परमात्मप्राप्तीत मनुष्य जितका स्वतंत्र आहे तितका इतर कोणत्या ही कार्यात स्वतंत्र नाही. ॥ ४४५ ॥

परमात्मप्राप्तीसाठी उपायांची तितकी जरूरी नाही जितकी अंत:करणाच्या लगनची जरूरी आहे. ॥ ४४६ ॥

भगवान् ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, ब्रह्मचारी, गृहस्थी, वानप्रस्थ, संन्यासी इत्यादींना प्राप्त होत नाहीत, तर 'भक्ताला' प्राप्त होतात. ॥ ४४७ ॥

धनाच्या प्राप्तीत तर क्रियेची मुख्यता असते. परंतु परमात्मप्राप्तीत लालसेची मुख्यता असते. ॥ ४४८ ॥

भगवत्प्राप्ती कर्माचे फल नाही, तर कृपेचे फल आहे, परंतु लगन स्वयंची असली पाहिजे. ॥ ४४९ ॥

संसार अधूरा आहे म्हणून अधूराच प्राप्त होतो आणि परमात्मा पूर्ण आहेत म्हणून पूर्णच मिळतात. ॥ ४५० ॥

ज्याने भगवत्प्राप्ती केली नाही, त्याने काही केले नाही, काही केले नाही, काही केले नाही! ॥ ४५१ ॥

भगवत्प्राप्तीत सर्वात मोठी बाधा आहे-भोग आणि संग्रहाची रुची. दुसऱ्यांच्या सुखाने सुखी झाल्यास 'भोगाची' रुची आणि दुसऱ्यांच्या दु:खाने दु:खी झाल्यास 'संग्रहाची' रुची समाप्त होते. ॥ ४५२ ॥

जे निरंतर बदलत आहे, त्या संसारावर विश्वास ठेवणे, त्याला सत्य मानणे हीच भगवत्प्राप्तीत मुख्य बाधा आहे. ॥ ४५३ ॥

संयोगजन्य सुखाची लोलुपता हीच नित्य प्राप्त भगवंताच्या अनुभवात प्रधान बाधक आहे. ॥ ४५४ ॥

भगवत्प्राप्तीत वस्तूंनी बंधन केले नाही, तर वस्तूंच्या महत्त्वाने

बंधन केले आहे. ॥ ४५५ ॥

आपल्यासाठी कर्म केल्याने आणि जडतेबरोबर (शरीराबरोबर) आपला संबंध मानल्याने सर्वव्यापी परमात्म्याच्या प्राप्तीत बाधा (आडकाठी) लागते. ॥ ४५६ ॥

परमात्मा सर्व देश, काळ इत्यादीत परिपूर्ण आहेत. संसाराची सत्यता मानल्यानेच मनुष्य परमात्म्याच्या दूरतेचा अनुभव करतो. ॥ ४५७ ॥

कोणतीही परिस्थिति परमात्मप्राप्तीला कारण नाही आणि कोणतीही परिस्थिती परमात्मप्राप्तीत बाधक नाही. कारण परमात्मा संपूर्ण परिस्थितींपासून अतीत आहेत. ॥ ४५८ ॥

परमात्मा दूर नाहीत, केवळ त्यांच्या प्राप्तीची लगन॰ कमी आहे. ॥ ४५९ ॥

संसार आहे, आत्ता आहे आणि आपला आहे—असे मानल्यानेच परमात्मा आहेत, आत्ता आहेत आणि आपले आहेत—असा अनुभव येत नाही. ॥ ४६० ॥

साधक 'परमात्मा आहे' हे तर मानतो. परंतु 'संसार नाही' हे मानीत नाही. त्यामुळेच परमात्मप्राप्तीत बाधा येत आहे. ॥ ४६१ ॥

कोणत्या एका मार्गाचा आग्रह ठेवल्याने तसेच दुसऱ्या मार्गांचा विरोध केल्याने पूर्णतेच्या प्राप्तीत फार मोठी बाधा येते. ॥ ४६२ ॥

आपल्या अंतःकरणात परमात्म्याशिवाय दुसऱ्याची महत्ता आहे-हीच परमात्मप्राप्तीत बाधक आहे. ॥ ४६३ ॥

भगवंताचा विश्वास भगवंतापेक्षाही श्रेष्ठ आहे. कारण जे भगवान् सदा सर्व ठिकाणी राहत असूनही प्राप्त होत नाहीत, ते विश्वासाने प्राप्त होतात. ॥ ४६४ ॥

परमात्मतत्त्व अनुभवस्वरूप आहे. केवळ आपली दृष्टी तिकडे नाही. ॥ ४६५ ॥

काही करू तेव्हाच तत्त्व मिळेल— हा भाव देहाभिमानाला पुष्ट करणारा आहे. करण्याने जे प्राप्त होईल ते अनित्य असेल. ॥ ४६६ ॥

संसाराच्या त्यागात 'विवेक' उपयोगी पडतो आणि भगवत्प्राप्तीत 'विश्वास' उपयोगी पडतो. ॥ ४६७ ॥

वास्तविक भगवान् ही विद्यमान आहेत, गुरूही विद्यमान आहेत, तत्त्वज्ञानही विद्यमान आहे आणि आपल्यात योग्यता, सामर्थ्य ही विद्यमान आहे. केवळ सुखाच्या आसक्तीमुळेच त्यांच्या प्रकट होण्यात बाधा येत आहे. ॥ ४६८ ॥

शरीराकडून संसाराचे काम (व्यवहार) अथवा सेवा तर होऊ शकते. परंतु परमात्मप्राप्ती होऊ शकत नाही. परमात्मप्राप्ती तर शरीरापासून असंग झाल्यावर आपोआपच होते आणि आपली-आपल्यालाच होते. ॥ ४६९ ॥

## (३०) भगवंताशी विमुखता

भगवंताशी विमुख झाल्यानेच मनुष्याला करण्याच्या जाणण्याच्या आणि प्राप्तीच्या उणीवेचा अनुभव येतो. ॥ ४७० ॥

परमात्मतत्त्वापासून विमुख झाल्याविना कोणताही सांसारिक भोग भोगलाच जाऊ शकत नाही आणि आसक्तीपूर्वक सांसारिक भोग भोगल्याने मनुष्य परमात्म्याशी विमुखी होतोच. ॥ ४७१ ॥

भगवंतापासून विमुख होताच जीव अनाथ होतो. ॥ ४७२ ॥

जे जगताला जाणात नाहीत, तेच जगतात फसतात आणि जे परमात्म्याला जाणत नाहीत तेच परमात्म्यापासून विमुख होतात. ॥ ४७३ ॥

संसारापासून काही प्राप्तीची इच्छा करतात आपण भगवंतापासून

विमुख होतो. ॥ ४७४ ॥

## ( ३१ ) भगवंताशी संबंध ( आत्मीयता )

मनुष्य सांसारिक वस्तू-व्यक्ती इत्यादीशी जितका आपला संबंध मानतो, तितकाच तो पराधीन होतो. त्याने जर केवळ भगवंताशी आपला संबंध मानला तर नेहमीसाठी तो स्वाधीन होईल. ॥ ४७५ ॥

साधकाने जर स्वतःला भगवंताचा समजून संसाराचे काम केले तर संसाराचेही काम योग्य होईल आणि भगवंताचेही! परंतु स्वतःला संसाराचा समजून संसाराचे काम केले तर सांसाराचेही काम योग्य होणार नाही आणि भगवंताचे काम (भजन) तर होणारच नाही! ॥ ४७६ ॥

प्रभू आपले आहेत परंतु आपल्यासाठी नाहीत तर आपण प्रभूंसाठी आहोत. तात्पर्य, आपल्याला प्रभूपासून काही घ्यायचे नाही तर आपण-स्वतः त्यांना अर्पित व्हायचे आहे आणि विपरीताहून विपरीत परिस्थिती आली तरीही त्याला प्रभूंनी पाठविलेला प्रसाद समजून प्रसन्न राहयचे आहे. ॥ ४७७ ॥

सदुपयोग करण्यासाठीच वस्तू आपली आहे आणि स्वतःला देण्यासाठीच भगवान् आपले आहेत. म्हणून वस्तूंना संसाराला समर्पित करा आणि स्वतःला भगवंताला समर्पित करा. ॥ ४७८ ॥

पती मरू शकतो, पत्नीचा त्याग ही करू शकतो, तरीही नवीन घरी जाताना मुलीला चिंता नसते परंतु भगवान् कधी मरत ही नाहीत आणि कधी आपला त्यागही करीत नाहीत, मग भगवंताशी संबंध जोडल्यावर कोणत्या गोष्टीची चिंता? भगवंतांना पकडणे येते पण सोडणे येतच नाही! ॥ ४७९ ॥

'मी भगवंताचा आहे आणि भगवान् माझे आहेत'—या आत्मीयते सारखी कोणतीच योग्यता, पात्रता, अधिकारिता इत्यादी नाही. ॥ ४८० ॥

भक्ताने आपल्या योग्यता इत्यादीकडे न पाहता केवळ भगवंताच्या आत्मीयते कडेच पाहिले पाहिजे. ॥ ४८१ ॥

भगवंतात आत्मीयता हे सर्वात सुगम आणि श्रेष्ठ साधन आहे. ॥ ४८२ ॥

भगवंताशिवाय माझे कोणीही नाही—ही खरी भक्ती आहे. ॥ ४८३ ॥

भगवान् सर्वसमर्थ असूनही आपल्यापासून वेगळे होण्यात असमर्थ आहेत. ॥ ४८४ ॥

भगवान् आपले आहेत, परंतु मिळालेली वस्तू आपली नाही, तर भगवंताची आहे. ॥ ४८५ ॥

मनुष्य पदार्थ आणि क्रियांना जेव्हा आपली मानतो तेव्हा तो सर्वथा परतंत्र होतो आणि भगवंतांना जेव्हा आपले मानतो किंवा त्यांना अनन्य शरण होतो तेव्हा तो सर्वथा स्वतंत्र होतो. ॥ ४८६ ॥

भगवंताबरोबर आपला संबंध स्वत:स्वाभाविक आहे. ह्या संबंधसाठी कोण्या बल, योग्यता, दुसऱ्याच्या साहय्यता इत्यादीची जरूरी नाही. ॥ ४८७ ॥

आत्ता जसा संसाराचा संबंध मानलेला आहे की, तो प्राप्त आहे, जवळ आहे, तसाच परमात्म्याचा संबंध माना आणि जसा परमात्म्याचा संबंध मानलेला आहे की, तो अप्राप्त आहे, दूर आहे, तसाच संसाराचा संबंध माना. ॥ ४८८ ॥

असे माना की, मी भगवंताचा आहे. तर 'मी संसाराचा आहे'

असे मानाल तर संसाराचे काम दूरच राहील, भगवंताचे भजन करीत असूनही भगवंताला विसरून जाल. ॥ ४८९ ॥

तुम्ही कसेही असा, आत्ता याच क्षणी माना की, ''मी भगवंताचा आहे.'' ॥ ४९० ॥

भगवंताचे ध्यान करण्यापेक्षा त्यांच्यात आत्मीयता करणे श्रेष्ठ आहे. आत्मीयता झाल्याने ध्यान आपोआप होते. आपोआप होणारे साधन श्रेष्ठ असते. ॥ ४९१ ॥

भगवंताला आत्मीयता जितकी प्रिय आहे, तितकी त्याग, तपश्चर्या इत्यादी प्रिय नाही. ॥ ४९२ ॥

परमात्म्याच्या सन्मुख होण्याचा उपाय आहे— संसाराशी सर्वथा विमुख होणे. ॥ ४९३ ॥

भगवंताशी असलेली दृढ आत्मीयता संपूर्ण दोषांना समाप्त करते. ॥ ४९४ ॥

जोपर्यंत भगवंताचा संबंध होत नाही तोपर्यंत सर्व लौकिकच होते. भगवंताचा संबंध झाल्यास सर्व अलौकिक होते. ॥ ४९५ ॥

आपण भगवंताला कोणती वस्तू जेव्हा मागतो तेव्हा आपला संबंध वस्तूशी होतो, भगवंताशी नव्हे. ॥ ४९६ ॥

जे आपले आहे ते आपल्यात निरंतर विद्यमान आहे. केवळ त्याची स्वीकृती करायची आहे. जे आपले नाही ते आपल्यापासून निरंतर वेगळे होत आहे, केवळ त्याची अस्वीकृती करायची आहे. ॥ ४९७ ॥

मनुष्यमात्राचा भगवंताशी साक्षात (सरळ) संबंध आहे. त्यात कोणत्याही मध्यस्तीची अथवा माध्यमाची जरूरी नाही. ॥ ४९८ ॥

# ( ३२ ) मन

मनाला भगवंतात लावणे इतके जरूरी नाही, जितके भगवंतात स्वत:ला लावणे जरूरीचे आहे. स्वत: भगवंतात लागाल तर मन आपोआप भगवंतात लागेल. ॥ ४९९ ॥

मनाची एकाग्रता योगमार्गात जितकी आवश्यक आहे, तितकी भक्तीत नाही. भक्तीत तर भगवंताच्या संबंधाची दृढता झाली पाहिजे. ॥ ५०० ॥

शांती त्यागाने मिळते, मनाच्या एकाग्रतेने नव्हे. ॥ ५०१ ॥

मनाला स्थिर करणे मूल्यवान नाही, तर स्वरूपाच्या स्वत:सिद्ध निरपेक्ष स्थिरतेचा अनुभव करणे मूल्यवान आहे. ॥ ५०२ ॥

मनात संसाराची जी आसक्ती आहे ती समाप्त करण्याची जितकी जरूरी आहे तितकी मनाची चंचलता समाप्त करण्याची जरूरी नाही. ॥ ५०३ ॥

जोपर्यंत मनाला संसारातून हटवून परमात्म्यात लावण्याची वृत्ती राहील, तोपर्यंत मनाचा सर्वथा निरोध होऊ शकणार नाही. मनाचा सर्वथा निरोध तेव्हा होईल, जेव्हा एका परमात्म्याशिवाय अन्य सत्तेची मान्यता राहणार नाही. ॥ ५०४ ॥

निष्कामभावाने बुद्धी स्थिर होते आणि अभ्यासाने मन स्थिर होते. कल्याण बुद्धीच्या स्थिरतेने होते, मनाच्या स्थिरतेने नव्हे. मनाच्या स्थिरतेने सिद्धी प्राप्त होतात. ॥ ५०५ ॥

मनाचे ऐक्य परमात्म्याशी नाही तर प्रकृतीशी आहे. म्हणून मन परमात्म्यात लीन तर होऊ शकते परंतु त्यांच्यात लागू शकत नाही. ॥ ५०६ ॥

# ( ३३ ) मनुष्य

सुख भोगण्यासाठी स्वर्ग आहे, दु:ख भोगण्यासाठी नरक आहे आणि सुखदु:खाहून अतीत होऊन स्वत:चे कल्याण करण्यासाठी मनुष्यशरीर आहे. ॥ ५०७ ॥

वास्तविक मनुष्यजन्म हाच सर्व जन्मांचा आदि आणि अंतिम जन्म आहे. जर मनुष्याने परमात्मप्राप्ती केली तर अंतिम जन्मसुद्धा हाच आहे आणि परमात्मप्राप्ती केली नाही तर अनंत जन्मांचा आदिजन्म सुद्धा हाच आहे. ॥ ५०८ ॥

स्वत:चा उद्धार करणे अथवा परमात्मतत्त्व प्राप्त करणे मनुष्यमात्राचा स्वधर्म आहे. कारण मनुष्यशरीर केवळ परमात्मप्राप्तीसाठीच मिळाळेले आहे. ॥ ५०९ ॥

शरीराशी आपला संबंध मानून भोग आणि संग्रहात लागणे मनुष्यमात्राचा परधर्म आहे. ॥ ५१० ॥

केवळ आकृतीने कोणी मनुष्य होत नाही. मनुष्य तोच आहे जो आपल्या विवेकाला महत्त्व देतो. ॥ ५११ ॥

मनुष्यात जर मानवता नसेल तर मनुष्य पशूपेक्षाही निकृष्ट आहे. कारण पशू तर आपल्या पूर्वकृत पापकर्मांचे फल भोगून मानवतेची तयारी करीत आहे. परंतु मनुष्य नवीन पापकर्म करून नरकांची, पशुतेची तयारी करीत आहे. ॥ ५१२ ॥

श्रेष्ठाती श्रेष्ठ जीवन्मुक्त अवस्था मनुष्यमात्रात स्वाभाविक आहे. ॥ ५१३ ॥

शरीराचा सदुपयोग केवळ संसाराच्या सेवेतच आहे. ॥ ५१४ ॥

भगवंताचे स्मरण ठेवणे आणि सेवा करणे-या दोन गोष्टीनेच मानवता सिद्ध होते. ॥ ५१५ ॥

मनुष्यशरीर मिळाले, परंतु परमात्मप्राप्ती झाली नाही तर ही फार मोठ्या शोकाची, दु:खाची गोष्ट आहे. ॥ ५१६ ॥

मनुष्यशरीर केवळ ऐकणे-शिकण्यासाठी नाही तर तत्त्वाचा अनुभव करण्यासाठी आहे. ऐकणे-शिकणे तर पशू-पक्ष्यांतही होते, यामुळेच ते सर्कसमध्ये काम करतात. ॥ ५१७ ॥

जो दुसऱ्यांची सेवा करीत नाही आणि भगवत्स्मरण करीत नाही तो मनुष्य म्हणविण्याचा अधिकारीच नाही. ॥ ५१८ ॥

कोणात्याही सुखभोगाच्या आरंभाला पाहणे पशुता आहे आणि त्याच्या परिणामाला पाहणे मनुष्यता आहे. ॥ ५१९ ॥

सृष्टीची रचना ही अशा रीतीने झाली आहे की, मनुष्याचे जीवन दुसऱ्यांसाठी आहे, आपल्यासाठी नाही. ॥ ५२० ॥

परमात्माप्राप्तीविना मनुष्यशरीर कोणत्याही कामाचे नाही. ॥ ५२१ ॥

ज्यांची भगवंताकडे रुची झाली आहे, तेच भाग्यशाली आहेत, तेच श्रेष्ठ आहेत आणि तेच मनुष्य म्हणविण्याला योग्य आहेत. ॥ ५२२ ॥

मनुष्यजन्माच्या सफलतेसाठी प्रत्येक क्षणी सावधान राहण्याची फार मोठी आवश्यकता आहे. ॥ ५२३ ॥

मनुष्यशरीराचा महिमा विवेकाच्या अनुषंगाने आहे, क्रियेच्या अनुषंगाने नाही. ॥ ५२४ ॥

वास्तविक मनुष्य ही कर्मयोनी नाही, तर साधनयोनी आहे. जो साधक नाही तो देवता किंवा असुर तर होऊ शकतो. परंतु मनुष्य होऊ शकत नाही. ॥ ५२५ ॥

'मनुष्य' नाव त्याचेच आहे जो परमात्मप्राप्तीचा जन्मजात अधिकारी आहे. ॥ ५२६ ॥

## ( ३४ ) ममता

जोपर्यंत मनुष्याची स्त्री-पुत्र इत्यादीत ममता राहते तोपर्यंत

त्याच्याद्वारा स्त्री-पुत्र इत्यादींची सुधारणा होणे असंभव आहे. कारण ममता हीच मूल अशुद्धी आहे. ॥ ५२७ ॥

मनुष्य आपल्याजवळ ममतापूर्वक जितकी सामुग्री ठेवतो, तितका असत्‌चा संग आहे. जितका असत्‌चा संग होतो तितके मनुष्याचे पतन होते. ॥ ५२८ ॥

ज्या ज्या वस्तूंना आपण आपली मानतो, त्या त्या वस्तूंचे आपण पराधीन होतो. पराधीन व्यक्तीला स्वप्नातदेखील सुख मिळत नाही— ***पराधीन सपनेहुँ सुखु नाहीं*** ॥ ५२९ ॥

संपूर्ण संसार परमात्म्याचा आहे परंतु जीव चुकीने परमात्म्याच्या वस्तूला आपली मानतो आणि त्यामुळेच बंधनात पडतो. ॥ ५३० ॥

शरीर, इंद्रिये इत्यादी कधी म्हणत नाहीत की, आम्ही तुमचे आहोत आणि तुम्ही आमचे आहात. आपणच त्यांना आपले मानतो. त्यांना आपले मानणे हीच अशुद्धी आहे— ***'ममता मल जरि जाइ।'*** ॥ ५३१ ॥

आपण घरात राहिल्याने फसत नाही तर घर आपले मानल्याने फसतो. ॥ ५३२ ॥

मनुष्य संसारात जितक्या वस्तूंना आपली मानतो, तितका तो त्यांच्या पराधीन होतो. परंतु परमात्माला आपले मानल्याने तो स्वाधीन होतो. ॥ ५३३ ॥

मनुष्य संसारात जितक्या वस्तूंना आपले आणि आपल्यासाठी मानतो, तितकाच तो फसतो. ॥ ५३४ ॥

शरीरारींना 'आपले' आणि 'आपल्यासाठी' मानणे ही फार मोठी चूक आहे. जर ही चूक दुरुस्त केली तर कल्याण होण्यात कोणताही संदेह राहत नाही ॥ ५३५ ॥

ज्याच्या बरोबर आपण सदा राहू शकत नाही आणि जो आपल्याबरोबर सदा राहू शकत नाही, त्याला आपले मानल्याने परिणामी रडण्याशिवाय दुसरे काहीही मिळणार नाही. म्हणून त्याला आपले न मानता त्याची सेवा करावी. ॥ ५३६ ॥

मिळालेल्या वस्तूला आपली मानणारा संसाराच्याही कामाचा नसतो स्वत:च्याही कामाचा नसतो आणि भगवंताच्याही कामाचा नसतो. ॥ ५३७ ॥

ममतारहित पुरुष जगताचे जितके कल्याण करू शकतो, तितके ममता असणारा करूच शकत नाही. ॥ ५३८ ॥

कोणत्याही वस्तूला आपली आणि आपल्यासाठी मानू नये तसेच कोणत्याही वस्तूची कामना करू नये. कारण वस्तूला आपली आणि आपल्यासाठी मानल्याने अशुद्धी येते आणि कामना करण्याने अशांती येते. ॥ ५३९ ॥

संसार प्रत्येक क्षणाला जात आहे. जाणाऱ्याशी ममता कराल तर रडावेच लागेल. परंतु राहणाऱ्या भगवंताशी आत्मीयता कराल तर नेहमीसाठी कृतकृत्य व्हाल. ॥ ५४० ॥

माझी म्हणविली जाणारी कोणतीही वस्तू सदा आपल्याबरोबर राहू शकत नाही, मग तिच्या ममतेच्या त्यागात काय कठिणता आहे? ॥ ५४१ ॥

शरीराला आपले मानणे केवळ दु:खप्राप्तीसाठी आहे आणि संसाराचे मानणे मुक्ती प्राप्तीसाठी आहे. ॥ ५४२ ॥

जी वस्तू आपल्यापासून वेगळी असते ती आपली नसते. वेगळी तीच वस्तू होते जी वास्तविक आपल्यापासून वेगळी आहे. ॥ ५४३ ॥

शरीराला आपले मानणे असत्‌चा संग आहे आणि शरीराला आपले न मानणे सत्‌चा संग आहे. ॥ ५४४ ॥

जर आपण शरीराला आपले मानले तर शरीरात होणारी स्थिती आपल्यात दिसेल आणि शरीरापर्यंत पोहचणारी गोष्ट आपल्यापर्यंत पोहचल्यासारखी दिसेल. ॥ ५४५ ॥

## ( ३५ ) मृत्यु आणि अमरता

शरीर-संसाराच्या संबंधाने मृत्युचा आणि भगवंताच्या संबंधाने अमरतेचा अनुभव येतो. ॥ ५४६ ॥

आपल्यासाठी कर्म केल्याने प्रथम कर्माशी आणि मग फलाशी संबंध जडतो. कर्म आणि फल—दोन्हीही उत्पन्न होऊन नष्ट होतात. परंतु अंतःकरणात जी आसक्ती राहते, ती वारंवार जन्म-मरण देते. ॥ ५४७ ॥

शरीराला 'मी' आणि 'माझे' मानणे प्रमाद आहे. प्रमाद हाच मृत्यु आहे. ॥ ५४८ ॥

कोणत्याही कार्याचे होणे न होणे अनिश्चित आहे, परंतु मरणे बिलकुल निश्चित आहे. ॥ ५४९ ॥

जसे शरीरासाठी मृत्यु सुलभ आहे तसेच आपल्यासाठी अमरता सुलभ आहे. ॥ ५५० ॥

## ( ३६ ) योग आणि भोग

सुखदायी परिस्थिती आल्यास सुखी आणि दुःखदायी परिस्थिती आल्यास दुःखी होणारा मनुष्य भोगी आहे, योगी नाही. योगी तर सुख आणि दुःख दोन्हीत समान राहतो. ॥ ५५१ ॥

भोगी व्यक्ती रोगी होतो दुःखी होतो आणि दुर्गतीत जातो ॥ ५५२ ॥

स्वत:च्या सुखाने सुखी होणारा कोणी मनुष्य योगी होत नाही. ॥ ५५३ ॥

भोगी योगी होत नाही तर रोगी होतो—'**भोगे रोगभयम्**'॥ ५५४ ॥

भोग दोन वस्तूच्या संयोगाने होतो आणि योग (परमात्म्याशी नित्य संबंध) एकट्यात, स्वत:सिद्ध असतो. जोपर्यंत भोग आहे तोपर्यंत योगाचा अनुभव येत नाही. भोगाचा सर्वथा त्याग झाल्यावरच योगाचा अनुभव होतो आणि योगाचा अनुभव झाल्यावर भोगाची इच्छा सर्वथा समाप्त होते. ॥ ५५५ ॥

परमात्म्याच्या संगाने योग आणि संसाराच्या संगाने भोग होतो. ॥ ५५६ ॥

एकान्ताचे सुख घेणे, मन लागण्याचे सुख घेणे भोग आहे, योग नाही. ॥ ५५७ ॥

संसाराशी संबंध जोडण्याचे नाव 'भोग' आहे आणि संबंध तोडण्याचे नाव 'योग' आहे. ॥ ५५८ ॥

कोणत्याही अवस्थेत खुष होणे भोग आहे. भोगाने व्यक्तीत्व समाप्त होत नाही. म्हणून साधकाने कोणत्याही अवस्थेत खुष होऊ नये. ॥ ५५९ ॥

संसाराचा वियोगही स्वत:सिद्ध आहे आणि परमात्म्याचा योगही स्वत:सिद्ध आहे. ॥ ५६० ॥

ज्याचा आपोआप वियोग होत आहे, त्याच्या संयोगाच्या इच्छेचा त्याग करा—याचे नाव 'योग' आहे. ॥ ५६१ ॥

जो कधी योगी आणि कधी भोगी असतो तो वास्तविक भोगीच आसते. ॥ ५६२ ॥

योग्याद्वारा सर्वांना सुख मिळते आणि भोग्याद्वारा सर्वांना दु:ख मिळते. ॥ ५६३ ॥

मला मिळावे—हा भोग आहे आणि दुसऱ्यांना मिळावे—हा योग आहे. ॥ ५६४ ॥

स्वत:ची सुख-सुविधा पाहणारा भोगी असतो, योगी नसतो. ॥ ५६५ ॥

जो नेहमीसाठी आणि सर्वांसाठी आहे, त्याची प्राप्ती 'योग' आहे. जो नेहमीसाठी आणि सर्वांसाठी नाही, त्याची प्राप्ती 'भोग' आहे. ॥ ५६६ ॥

भगवंताला आपले मानणे योग आहे आणि भगवंताकडून काही इच्छिणे भोग आहे. ॥ ५६७ ॥

'योग' वियोगामुळे होतो आणि 'भोग' संयोगामुळे होतो. ॥ ५६८ ॥

भोगी व्यक्ती कित्येक जणांचा ऋणी असतो. परंतु योगी कोणाचाही ऋणी नसतो. ॥ ५६९ ॥

## ( ३७ ) राग आणि द्वेष

राग-द्वेष अंत:करणाचे आगन्तुक विकार आहेत, धर्म नव्हे. धर्मस्थायी राहतो आणि विकार अस्थायी अर्थात् येणारे—जाणारे असतात. राग-द्वे५ अंत:करणात येणारे-जाणारे आहेत. म्हणून त्यांना समाप्त केले जाऊ शकते. ॥ ५७० ॥

साधकाची प्रवृत्ती आणि निवृत्ती राग-द्वेषपूर्वक नसावी तर शास्त्रानुसार असावी. ॥ ५७१ ॥

राग-द्वेषपूर्वक केल्या गेलेल्या कामाचा परिणाम चांगला होत नाही. ॥ ५७२ ॥

विवेक अनादी आहे, आसक्ती आपण निर्माण केली आहे. संसारात आसक्ती असल्याने विवेक दबतो आणि विवेक जागृत झाल्यास आसक्ती समाप्त होते. ॥ ५७३ ॥

दुसऱ्या साधकाविषयी द्वेषवृत्ती असल्याने आपल्या साधनेच्या सिद्धीत महान बाधा होते. ॥ ५७४ ॥

निरंतर परिवर्तनशील असणाऱ्या संसाराला स्थिर मानल्यानेच राग-द्वेषादी द्वन्द्व उत्पन्न होतात. ॥ ५७५ ॥

ज्याच्यात आसक्ती होते, त्याच्यात दोष दिसत नाहीत आणि ज्याच्यात द्वेष होतो, त्याच्यात गुण दिसत नाहीत. राग-द्वेषरहित झाल्यावरच वस्तू आपल्या वास्तविक रूपाने दिसते. ॥ ५७६ ॥

वास्तविक सर्वकाही चिन्मयच आहे. परंतु राग-द्वेषामुळे ते जड दिसते. राग-द्वेष नसेल तर एका चिन्मय तत्त्वाशिवाय (परमात्म्याशिवाय) दुसरे काही नाहीच. ॥ ५७७ ॥

## ( ३८ ) देणे-घेणे

सुख घेतल्याने अंतःकरण अशुद्ध होते आणि सुख देण्याने अंतःकरण शुद्ध होते. ॥ ५७८ ॥

या संसार-समुद्रापासून जो घेऊ इच्छितो तो बुडून जातो आणि जो देऊ इच्छितो तो तरून जातो. ॥ ५७९ ॥

'देण्याच्या' भावाने समाजात एकता, प्रेम उत्पन्न होते आणि 'घेण्याच्या' भावाने संघर्ष उत्पन्न होतो. ॥ ५८० ॥

'देण्याचा' भाव उद्धार करणारा आणि 'घेण्याचा' भाव पतन करणारा असतो ॥ ५८१ ॥

शरीराला 'मी', 'माझे' अथवा 'माझ्यासाठी' मानल्याने 'घेण्याचा' भाव उत्पन्न होतो. ॥ ५८२ ॥

केवळ सेवा करण्यासाठीच दुसऱ्यांशी संबंध ठेवा. घेण्यासाठी संबंध ठेवाल तर दुःख भोगावे लागेल. ॥ ५८३ ॥

घेऊन दान करण्यापेक्षा न घेणेच उत्तम आहे. ॥ ५८४ ॥

घेऊन देण्यापेक्षा न घेण्याचे फार मोठे पुण्य आहे. परंतु ही गोष्ठ समजणारे फार कमी आहेत! ॥ ५८५ ॥

संसारापासून काहीही घेणे पाप आहे आणि देणे पुण्य आहे. ॥ ५८६ ॥

सुख घेण्यासाठी शरीरही आपले नाही आणि सुख देण्यासाठी (सेवा करण्यासाठी) संपूर्ण संसार आपला आहे. ॥ ५८७ ॥

घेण्याच्या इच्छेने मनुष्य दास होतो आणि केवळ देण्याच्या इच्छेने मालक होतो. ॥ ५८८ ॥

घेण्याच्या भावाने भोग होतो आणि देण्याच्या भावाने योग होतो. ॥ ५८९ ॥

शरीराला आवश्यकतेनुसार अन्न-जल-वस्त्र द्यावे. परंतु शरीराशी संबंध जोडून अन्न-जल-वस्त्र घेणारा होऊ नये. घेणे बंधन आहे आणि देणे मुक्ती आहे. ॥ ५९० ॥

## ( ३९ ) शरणागती

संसाराचा आश्रय घेतल्याने पराधीनता आणि भगवंताचा आश्रम घेल्याने स्वाधीनता प्राप्त होते. ॥ ५९१ ॥

भगवंताचा आश्रय घेतल्याविना भगवंताला जाणाणे असंभव आहे. ॥ ५९२ ॥

एका भगवंताशिवाय दुसऱ्या कोणाचाही आश्रय न घेणे हीच 'अनन्यता' आहे. ॥ ५९३ ॥

संसाराचा आश्रयच भगवंताच्या शरणागतीत बाधक आहे. ॥ ५९४ ॥

भय दुसऱ्याकडून होते आपल्याकडून नव्हे. भगवान् आपले आहेत. म्हणून त्यांना शरण गेल्यावर मनुष्य नेहमीसाठी निर्भय होतो. ॥ ५९५ ॥

भगवंताची शरणागती स्वीकार केल्यावर मग भक्ताने कोणत्याही प्रकारचा संदेह, परीक्षा, विपरीत भावना आणि कसोटी लावू नये. ॥ ५९६ ॥

भगवंताशी असलेल्या आपल्या नित्य संबंधाला ओळखणे हेच भगवंताला शरण होणे आहे. शरण झाल्यावर भक्त निश्चिंत, निर्भय, नि:शोक आणि नि:शंक होतो. ॥ ५९७ ॥

भगवंतासाठी आपल्या इच्छेचा त्याग करणे हीच शरणागती आहे. ॥ ५९८ ॥

शरणागती मन-बुद्धीने होत नाही, तर स्वत: द्वारा होत असते. ॥ ५९९ ॥

परमात्म्याच्या आश्रयापेक्षा श्रेष्ठ दुसरा कोणताही आश्रय नाही. ॥ ६०० ॥

शरणागती आणि प्रारब्ध— या दोघांचे तात्पर्य चिंतेच्या त्यागात आहे. पुरुषार्थचा शास्त्रोक्त कर्तव्य कर्माचा त्याग करण्यात नाही. ॥ ६०१ ॥

सर्व जीव परमात्म्याचे साक्षात् अंश आहेत. म्हणून जोपर्यंत हा जीव आपल्या अंशी परमात्म्याचा आश्रय घेत नाही, तोपर्यंत हा दुसऱ्यांचा आश्रय घेऊन पराधीन होतच राहील, दु:ख भोगतच राहील. ॥ ६०२ ॥

जोपर्यंत मनुष्य भगवंताचा आश्रय घेत नाही तोपर्यंत कोणाताही आश्रय टिकणार नाही आणि तो दु:ख भोगतच राहील. ॥ ६०३ ॥

ज्याच्यात आपल्या साधनेचा अभिमान नाही आणि ज्याला आपल्या कल्याणाचा इतर कोणाताही उपाय दिसत नाही, तोच भगवंताच्या शरणागतीचा अधिकारी आहे. ॥ ६०४ ॥

आश्रय त्याचाच घ्यावा, जो आपल्यापासून वेगळा, दूर, विमुख आणि भिन्न होऊ शकत नाही, तसेच आपण त्याच्यापासून

वेगळे, दूर, विमुख, आणि भिन्न होऊ शकत नाही. ॥ ६०५ ॥

आपल्यात काही विशेषता दिसत असेल तर ती शरणागतीत बाधक आहे. ॥ ६०६ ॥

वेदांचे सार उपनिषद् आहेत, उपनिषदांचे सार गीता आहे आणि गीतेचा सार भगवंताची शरणागती आहे. ॥ ६०७ ॥

जोपर्यंत आपल्या बलाचा अभिमान राहतो, तोपर्यंत शरणागती होत नाही. ॥ ६०८ ॥

शरणागती फार सुगम आहे. परंतु अभिमानी व्यक्तीसाठी फार कठीण आहे. मी काही करू शकतो—हा अभिमान जोपर्यंत राहील तोपर्यंत शरण होणे कठीण आहे. ॥ ६०९ ॥

भगवंताला शरण गेल्याने जे तत्त्व प्राप्त होते, ते आपल्या प्रयत्नाने मिळत नाही. ॥ ६१० ॥

सर्व प्रकारे एका भगवंताला शरण होण्यापेक्षा श्रेष्ठ दुसरे कोणतेही साधन नाही. ॥ ६११ ॥

## ( ४० ) संत-महात्मा

संत-महापुरुषांच्या उपदेशानुसार आपले जीवन घडविणे हीच त्यांची खरी सेवा आहे. ॥ ६१२ ॥

जसे सूर्यद्वारा सर्वांना समानरूपाने प्रकाश मिळतो, तसेच संत-महात्मा यांच्या द्वारा सर्वांचे समानरूपाने हित होते. ॥ ६१३ ॥

सूर्य बाहेर प्रकाश करतो आणि संत-महात्मा अंत:करणात प्रकाश करतात. ॥ ६१४ ॥

संत-महापुरुषांची सर्वात मोठी सेवा आहे— त्यांच्या सिद्धान्तानुसार आपले जीवन घडविणे. कारण त्यांना सिद्धान्त जितके प्रिय असतात, तितके स्वत:चे प्राणही प्रिय नसतात. ॥ ६१५ ॥

भगवान्, संत-महात्मा, धर्म आणि शास्त्र—हे कधी कोणापासून विन्मुख होत नाहीत. केवळ जीव यापासून विन्मुख होतो. ॥ ६१६ ॥

समुद्रातून कोणी मोहरी (राई) काढू शकत नाही. संतांनी संसारातील संपूर्ण ग्रंथामधून 'गीता' काढून आपणाला दिली. ही त्यांची किती विलक्षण कृपा आहे! ॥ ६१७ ॥

भगवंतापासून लाभ मिळविण्यासाठी आपल्यात पाच गोष्टी पाहिजेत नापजप, ध्यान, सेवा, आज्ञापालन आणि संग. परंतु संतांपासून लाभ मिळविण्यासाठी आपल्यात तीनच गोष्टी पाहिजेत सेवा, आज्ञापालन आणि संग. ॥ ६१८ ॥

धनीलोक तर दुसऱ्याला नोकर बनवितात. परंतु संतलोक दुसऱ्यालाही संतच बनवितात. ॥ ६१९ ॥

भगवान्, संत, सच्छास्त्र आणि सद्विचार—ह्या चार गोष्टी साधकाला कधी निराश करीत नाहीत, तर त्याची उन्नती करतात. ॥ ६२० ॥

समाजाचा सर्वात अधिक सुधार वीतरागी संताद्वाराच होत असतो. ॥ ६२१ ॥

संत-महात्मा संसारात लोकांना आपल्याकडे आकर्षित करण्यासाठी येत नाहीत, तर भगवंताकडे आकर्षित करविण्यासाठी येतात. जो लोकांना आपल्याकडे (आपले ध्यान, पूजन इत्यादीत) आकर्षित करतो तो भगवद्द्रोही आणि नरकात घेऊन जाणारा असतो. ॥ ६२२ ॥

## ( ४१ ) संसार

संसारातील सर्व संयोग निरंतर वियोगरूपी अग्नीत जळत आहेत. ज्याच्याशी संयोग होतो त्याच्याशी वियोग होणे निश्चित आहे. चूक ही होते की, त्या संयोगाला आपण नित्य मानतो. ॥ ६२३ ॥

संसारातील संयोगाचा वियोग अवश्यंभावी आहे. परंतु वियोगाचा संयोग अवश्यंभावी नाही. म्हणून संसारातील वियोग 'वियोग' हाच सत्य आहे. ॥ ६२४ ॥

नाशवान् भौतिक पदार्थांच्या संबंधाने कोणाचा शोक कधी नाहीसा होऊच शकत नाही. ॥ ६२५ ॥

उत्पत्ति-विनाशशील वस्तूंच्या वश न होणे अर्थात् त्यांचा आश्रय न घेणे हाच मनुष्याचा वास्तविक विजय आहे. ॥ ६२६ ॥

जोपर्यंत संसार-शरीर यांचा आश्रय सर्वथा समाप्त होणार नाही, तोपर्यंत जगण्याची आशा, मरण्याचे भय, करण्याची आसक्ती आणि प्राप्तीची लालच—हे चारी नष्ट होत नाहीत. ॥ ६२७ ॥

मनुष्य आसक्तीपूर्वक संसाराशी संबंध जोडतो, संसार कधी संबंध जोडत नाही. ॥ ६२८ ॥

संसारात मिसळल्याने संसाराचे ज्ञान होत नाही आणि परमात्म्यापासून वेगळे राहिल्याने परमात्म्याचे ज्ञान होत नाही— असा नियम आहे. ॥ ६२९ ॥

संसाराशी एकता आणि परमात्म्याशी भिन्नता चुकीने मानलेली आहे. ॥ ६३० ॥

विनाशीशी आपला संबंध मानल्याने अंतःकरण, कर्म आणि पदार्थ—तिन्हीही मलिन होतात आणि विनाशीशी मानलेल्या संबंधाचा त्याग झाल्याने हे तिन्हीही आपोआप पवित्र होतात. ॥ ६३१ ॥

जोपर्यंत संसाराशी संयोग असतो तोपर्यंत भोग होतो योग नव्हे. संसाराच्या संयोगाचा मनाने सर्वथा वियोग झाल्यावर योगसिद्ध होतो अर्थात् परमात्म्याशी असलेल्या आपल्या स्वतःसिद्ध नित्य योगाचा अनुभव होतो. ॥ ६३२ ॥

संसाराशी मानलेल्या संबंधाचा विच्छेद करण्यासाठी एकतर मिळालेल्या (शरीरादी) पदार्थांना संसाराचेच समजून त्यांना संसाराच्या सेवेत लावावे अथवा जडतेपासून (शरीरापासून) संबंध-विच्छेद करून आपल्या स्वरूपात स्थित व्हावे अथवा याच्या (शरीरादी) सहित भगवंताला शरण व्हावे. ॥ ६३३ ॥

उत्पत्ति विनाशशील वस्तूंचा आश्रय घेऊन, त्यांच्याशी संबंध जोडून सुखाचा इच्छुक मनुष्य कधी सुखी होऊ शकत नाही—हा नियम आहे. ॥ ६३४ ॥

नाशवानाचे दास्यत्व हेच अविनाशीच्या सन्मुख होऊ देत नाही. ॥ ६३५ ॥

संसाराची सामुग्री संसाराच्या उपयोगाची आहे, आपल्या उपयोगाची नाही. ॥ ६३६ ॥

संसारा विश्वास करण्यालायक नाही, तर सेवा करण्यायोग्य आहे. ॥ ६३७ ॥

नाशवानाशी आत्मीयता अशांतीकारक आणि बंधनकारक आहे. ॥ ६३८ ॥

असत्‌ला असत् जाणल्यावरही जोपर्यंत असत्‌शी आकर्षण समाप्त होत नाही तोपर्यंत सत्‌ची प्राप्ती होत नाही. (जसे सिनेमाला असत्य जाणूनही त्याचे आकर्षण राहते.) ॥ ६३९ ॥

जसा भगवंताचा आश्रय कल्याण करणारा आहे, तसेच रुपये इत्यादी उत्पत्तिविनाशशील वस्तूंचा आश्रय पतन करणारा आहे. ॥ ६४० ॥

केवळ प्राकृत पदार्थांना महत्त्व देणे अनर्थाचे मूळ आहे. ॥ ६४१ ॥

विश्वास भगवंतावरच केला पाहिजे. उत्पत्ति-विनाशशील

वस्तूंवर विश्वास केल्यास धोकाच होईल, दु:खच भोगावे लागेल. ॥ ६४२ ॥

भगवंताशी आपला वियोग आणि संसाराशी आपला संयोग कधी होऊच शकत नाही. ॥ ६४३ ॥

आपण संसाराबरोबर कधी राहूच शकत नाहीत आणि परमात्म्यापासून कधी वेगळे होऊच शकत नाही. ॥ ६४४ ॥

असत्‌च्या संगानेच संपूर्ण दोष आणि विषमता यांची उत्पत्ती होते. ॥ ६४५ ॥

शरीर-संसाराचे निरंतर परिवर्तन आपल्याला क्रियात्मक असा उपदेश देत आहे की, तुमचा संबंध अपरिवर्तनशील तत्त्वाशी (परमात्म्याशी) आहे, आमच्याशी नाही, आम्ही तुमच्याबरोबर आणि तुम्ही आमच्या बरोबर राहू शकत नाही. ॥ ६४६ ॥

आत्ता ज्या वस्तू, व्यक्ती इत्यादी आपल्याजवळ आहेत, त्यांची संगत कुठपर्यंत राहील— याच्यावर प्रत्यकाने विचार करणे गरजेचे आहे. ॥ ६४७ ॥

आपण शरीराला ठेवू इच्छितो, सुख-आराम इच्छितो, आपली मनइच्छित गोष्ट पूर्ण करू इच्छितो— हा सर्व असत्‌चा आश्रय आहे. ॥ ६४८ ॥

जो कधी आहे आणि कधी नाही, कुठे आणि कुठे नाही, कोणात आहे, कोणात नाही, कोणाचा आहे आणि कोणाचा नाही, तो वास्तविक नाहीच. ॥ ६४९ ॥

वस्तू आणि व्यक्ती तर राहत नाहीत. परंतु त्यांच्याशी मानलेला संबंध राहतो. हा मानलेला संबंध हाच जन्म-मरणाला कारण होतो. ॥ ६५० ॥

सर्व संसार आपल्या गतीने जात आहे. आपणच त्याला

(जाणाऱ्याला) पकडतो आणि तो निघून गेल्यावर रडत बसतो. ॥ ६५१ ॥

जो संसाराची आवश्यकता मानीत नाही त्याच्या आवश्यकतेची पूर्ती संसार करतो. परंतु जो संसाराची आवश्यकता मानतो त्याचे संसार शोषण करून त्याचा त्याग करतो. ॥ ६५२ ॥

मनुष्य जोपर्यंत सांसारिक पदार्थांचा संबंध ठेवतो आणि त्यांची आवश्यकता समजतो, तोपर्यंत तो कधीही सुखी होत नाही. ॥ ६५३ ॥

संसाराला सत्ता देण्यामुळे संयोग-वियोग होतात आणि महत्ता दिल्यामुळे सुखदु:ख होतात. ॥ ६५४ ॥

संसाराची सत्ता बाधक नाही तर त्याच्या महत्तेचा परिणाम बाधक आहे. महत्तेचा परिणाम झाल्याने दास्यत्व येते. ॥ ६५५ ॥

संसाराचा संयोग अनित्य आहे आणि वियोग नित्य आहे. नित्याला स्वीकार करणे मनुष्याचे कर्तव्य आहे. ॥ ६५६ ॥

संसाराच्या ज्या वस्तूंना आपण फार मोठे महत्व देतो त्याचे काम हेच आहे की, ते आपल्याला परमात्मप्राप्ती होऊ देणार नाहीत आणि स्वत:ही राहणार नाहीत. ॥ ६५७ ॥

संसार असत्य असो अथवा सत्य असो, परंतु त्याच्याशी आपला संबंध असत्य आहे—ही नि:सन्देह गोष्ट आहे. ॥ ६५८ ॥

हा संसार मेंहदीच्या पानासारखा बाहेरुन हिरवादिसतो, परंतु त्याच्या आत परमात्मरूप लाली परिपूर्ण आहे. ॥ ६५९ ॥

आपण स्वत: चेतन तसेच अविनाशी आहोत आणि सांसारिक वस्तू जड तसेच विनाशी आहेत. दोन्हींची जात वेगवेगळी आहे. मग दुसऱ्या जातीची वस्तू आपल्याला कशी मिळू शकते? ॥ ६६० ॥

जसा सूर्योदय झाल्यावर सूर्य निरन्तर अस्ताकडेच जातो, तसेच उत्पन्न झाल्यानंतर सर्वसंसार निरन्तर अभावाकडेच जात आहे. ॥ ६६१ ॥

संसार विजातीय आहे आणि विजातीय वस्तूशी संबंध होतच नाही, केवळ संबंधाची मान्यता होते. संबंधाची मान्यता हीच अनर्थाचे कारण आहे. जी समाप्त होताच मुक्ती स्वत:सिद्ध आहे. ॥ ६६२ ॥

सांसारिक पदार्थ मान, सन्मान, प्रशंसा, आराम, सत्कार इत्यादी प्रिय वाटणे पतनाला कारण आहे. ॥ ६६३ ॥

जे नाही त्याची सत्ता मानून त्याला प्राप्त करण्याची अथवा समाप्त करण्याची इच्छा करणे असत्‌चा संग आहे. ॥ ६६४ ॥

वस्तू, व्यक्ती, क्रिया यांचा संबंध मनुष्याला पराधीन करणारा आहे. यांच्यापासून असंग झाल्यावरच मनुष्य स्वाधीन होऊ शकतो. ॥ ६६५ ॥

जोपर्यंत आपल्यावर जडाचा (संसाराचा) परिणाम होतो तोपर्यंत आपली स्थिती जडातच आहे असे समजावे, चिन्मय तत्त्वात नाही. ॥ ६६६ ॥

शरीर-संसाराला विसरून जाण्याने (निद्रेत) विश्राम मिळतो, परंतु त्यांच्याशी संबंध-विच्छेद झाला तर परम विश्राम मिळतो. ॥ ६६७ ॥

शरीर-संसारापासून असंग होण्यासाठी विचाराची आवश्यकता आहे, अभ्यासाची नव्हे. ॥ ६६८ ॥

अनंत ब्रह्मांडात कोणतीही वस्तू आपली आणि आपल्यासाठी नाही. ॥ ६६९ ॥

ज्याचा कोणत्याही देश, काल, क्रिया, वस्तू, व्यक्ती, अवस्था, परिस्थिती, घटना इत्यादीत अभाव आहे, कुठेही भाव नसतो अर्थात् त्याचा सदाच अभाव आहे आणि ते असत् आहे— '**नासतो विद्यते भाव:**' (गीता २ । १६) ॥ ६७० ॥

## ( ४२ ) सद्गुण आणि दुर्गुण

जितके काही दुर्गुण दुराचार आहेत, ते सर्व मनुष्याने बनविलेले आहेत, भगवंताने बनविलेले नाहीत. भगवान् 'सत्' आहेत आणि दुर्गुण-दुराचार 'असत्' आहेत. सत्पासून असत्ची उत्पत्ती कशी होऊ शकते? ॥ ६७१ ॥

संसारापासून विमुख झाल्यावर विना प्रयत्न आपोआप सद्गुण येतात. ॥ ६७२ ॥

जेव्हा जीव परमात्म्याला सन्मुख होतो, तेव्हा सर्वसद्गुण येतात आणि जेव्हा संसाराला सन्मुख होतो तेव्हा सर्व अवगुण येतात. ॥ ६७३ ॥

आपल्या निर्बलतेचे दुःख असेल आणि भगवंताच्या कृपेवर विश्वास असेल तर जो दुर्गुण नाहीसा करू इच्छिताल तो नाहीसा होईल आणि जो सद्गुण अंगी बाणू इच्छिताल तो येईल. ॥ ६७४ ॥

सद्गुण-सदाचार आपल्यात मानल्याने अभिमान उत्पन्न होतो आणि दुर्गुण-दुराचार आपल्यात मानल्याने ते स्थायी होतात. ॥ ६७५ ॥

## ( ४३ ) सत्संग आणि कुसंग

सत्संगापासून जितका लाभ होतो, तितका एकान्तात राहून साधन करण्याने होत नाही. ॥ ६७६ ॥

सत्संगात काहीही न करता उन्नती होते आणि कुसंगात काहीही न करता पतन होते. ॥ ६७७ ॥

असत्च्या संगाचा त्याग केल्याशिवाय सत्संगाचा प्रत्यक्ष लाभ होत नाही. ॥ ६७८ ॥

केवळ श्रवण केल्याने सत्संग होत नाही. सत्संग होतो— सत्शी संबंध जोडण्याने, सत्ला महत्त्व देण्याने. ॥ ६७९ ॥

सर्वात परिपूर्ण असलेल्या परमात्म्याला पाहणे सत्संग (सत्चा

संग) आहे. ॥ ६८० ॥

भगवंतात प्रेम होणे हाही सत्संग आहे आणि नाशवानाचे प्रेम (मोह) सुटणे हाही सत्संग आहे. ॥ ६८१ ॥

जसे शरीरासाठी भोजन आवश्यक आहे, तसेच पारमार्थिक जीवनासाठी सत्संग आवश्यक आहे. ॥ ६८२ ॥

जसे मनुष्यशरीर वारंवार प्राप्त होत नाही, तसेच मनुष्यशरीर मिळूनही सत्संग वारंवार मिळत नाही. ॥ ६८३ ॥

सत्संग आपल्या पुरुषार्थाने प्राप्त होत नाही, तर केवळ भगवत्कृपेने प्राप्त होतो. ॥ ६८४ ॥

जेथे स्वार्थ असतो तेथे सत्संग होत नाही, तर कुसंग होतो. ॥ ६८५ ॥

प्रत्येक परिस्थितीत प्रसन्न राहण्याची विद्या सत्संगातूनच मिळते. ॥ ६८६ ॥

सत्य गोष्ट स्वीकार करा—हाच सत्संग आहे. ॥ ६८७ ॥

जसे जठराग्नी कमजोर झाला तर अन्न पचत नाही तसेच अंत:करणात लगन नसेल तर सत्संगाच्या गोष्टी पचत नाहीत. ॥ ६८८ ॥

भगवंताच्या विशेष कृपेची ओळख आहे—सत्संग प्राप्त होणे. ॥ ६८९ ॥

व्यापारात तर लाभ आणि हानी दोन्ही होतात, परंतु सत्संगात लाभ-च-लाभ होतो, हानी होतच नाही. ॥ ६९० ॥

सत्संगातील गोष्टींना महत्त्व दिल्यामुळे वृत्तीत फार फरक पडतो आणि विकार आपोआप नष्ट होतात. ॥ ६९१ ॥

भोगात जितकी आसक्ती असते, तितकी बुद्धीत जडता येते, ज्यामुळे सत्संगाच्या तात्त्विक गोष्टी वाचून-ऐकूनसुद्धा समजत नाहीत. ॥ ६९२ ॥

संसारापासून काही घेण्याची इच्छा होताच कुसंग सुरु होतो. ॥ ६९३ ॥

शरीर-संसाराशी आपला संबंध मानणे कुसंग आहे. ॥ ६९४ ॥

कुसंगाने हानी होत नाही, तर कुसंग स्वीकार करण्याने हानी होते. ॥ ६९५ ॥

ईश्वर, परलोक आणि धर्म यांना न मानणाऱ्या नास्तिकाचा संग सर्वांत अधिक पतन करणारा आहे. ॥ ६९६ ॥

आपल्या अत:करणात दोष असतो म्हणूनच बाहेरून झालेल्या कुसंगाचा परिणाम होतो. कारण आकर्षण सजातीयतेत होते विजातीयतेत नव्हे. ॥ ६९७ ॥

सत्संग, सद्विचार, सच्छास्त्र आणि दु:ख—हे चारीही विवेकीसाठी संसारापासून संबंध-विच्छेद करणारे आहेत. ॥ ६९८ ॥

कित्येक वर्षांपासून साधन करूनही जे तत्त्व प्राप्त होत नाही, ते सत्संगाने तात्काळ प्राप्त होऊ शकते. ॥ ६९९ ॥

साधन करणे म्हणजे स्वत: धन कमविणे आहे आणि सत्संग करणे म्हणजे धनवान् व्यक्तीला दत्तक जाणे आहे. जसे दत्तक गेलेल्याला कमविलेले धन प्राप्त होते, तसेच सत्संगात जाण्याने केल्याविना साधन होते. ॥ ७०० ॥

## (४४) वेळ

गेलेले धन पुन्हा प्राप्त होऊ शकते, परंतु गेलेला वेळ पुन्हा प्राप्त होत नाही. धनाप्रमाणे वेळेला तिजोरीत बंद करून ठेवू ही शकत नाही. म्हणून प्रत्येक वेळेत सावधान राहून वेळेचा सदुपयोग केला पाहिजे. ॥ ७०१ ॥

पैशाला तरी तिजोरीत बंद करून ठेवले जाऊ शकते, परंतु वेळेला बंद करून ठेवले जाऊ शकत नाही. म्हणून आपल्या

अमूल्य वेळेला व्यर्थ कामात खर्च करू नये॥ ७०२॥

वेळेचा सदुपयोग न करणारी व्यक्ती कोणत्याही क्षेत्रात सफल होऊ शकत नाही.॥ ७०३॥

दिसायला असे दिसते की, वेळ जात आहे, परंतु वास्तविक शरीर जात आहे.॥ ७०४॥

विचार करा की, जी वेळ निघून गेली, त्या वेळेच्या सदुपयागाने आपण परमात्मप्राप्तीच्या मार्गावर किती अग्रेसर झालो?॥ ७०५॥

## (४५) साधक

निषिद्ध कर्म करणारी कोणतीही व्यक्ती साधक बनू शकत नाही.॥ ७०६॥

साधक मग तो असत्शी विन्मुख होवो अथवा सत्शी सन्मुख होवो. दोन्ही पैकी कोणते तरी एक काम करावेच लागेल तरच आपत्ती समाप्त होईल.॥ ७०७॥

साधकासाठी 'मला तर केवळ परमात्मप्राप्तीच करायची आहे'—या निश्चयाची आणि यावर दृढ अटळ राहण्याची फार मोठी आवश्यकता आहे.॥ ७०८॥

साधकाने स्वतःला कधी भोगी किंवा संसारी व्यक्ती समजू नये. त्याने सदा जागृत राहिले पाहिजे की 'मी साधक आहे'.॥ ७०९॥

जडतेपासून जितका संबंध-विच्छेद होत जातो, तितकी साधकात विलक्षणता येत राहते.॥ ७१०॥

साधक त्यालाच म्हणावे जो निरंतर सावधान राहतो.॥ ७११॥

साधकाने आपली स्थिती स्वाभाविकरूपाने परमात्म्यातच मानली पाहिजे, जी वास्तविक आहे. आपली स्थिती संसारात

मानणारा साधक साधनेपासून पतीत होतो. ॥ ७१२ ॥

साधकाने विचार करावा की, जर माझ्याकडून कोणाला लाभ झाला नाही, कोणाचे हित झाले नाही, कोणाची सेवा झाली नाही तर मी साधक कसा? ॥ ७१३ ॥

साधकाला साधन आणि सिद्धीच्या विषयात चिंता नसायला पाहिजे. परंतु भगवत्प्राप्तीसाठी व्याकुळता आवश्य व्हायला पाहिजे. कारण चिंता भगवंतापासून दूर करणारी आहे आणि व्याकुळता भगवत्प्राप्ती करविणारी आहे. ॥ ७१४ ॥

जोपर्यंत आपल्या व्यक्तित्वाचे भान आहे तोपर्यंत साधकाने संतोष करू नये. ॥ ७१५ ॥

आपसात मतभेद असणे आणि आपल्या मतानुसार साधन करून जीवन घडविणे दोष नाही, तर दुसऱ्यांचे मत निकृष्ट वाटणे, त्यांच्या मताचे खंडन करणे, त्यांच्या मताविषयी घृणा करणे हाच दोष आहे. ॥ ७१६ ॥

जोपर्यंत साधकाला आपल्या स्थितीवर असंतोष होत नाही तोपर्यंत त्याची उन्नती होत नाही. ॥ ७१७ ॥

साधकाने केवळ इतके सावध रहावे की, त्याला जी वस्तू नाशवान् दिसेल त्यात त्याने फसू नये, त्याला महत्त्व देऊ नये. नाशवान् वस्तूला उपयोगात आणावे. परंतु त्याचे दास्यत्व स्वीकार करू नये. ॥ ७१८ ॥

साधकाने मतवादी न होता तत्त्ववादी व्हावे. ॥ ७१९ ॥

भोगी व्यक्तीला तर झोप मित्रासारखी प्रिय वाटते. परंतु साधन-भजन करणाऱ्याला झोप वैऱ्यासारखी अप्रिय वाटते. ॥ ७२० ॥

भजन न करणाऱ्यासाठी तर हा कलियुगाचा काळ आहे. परंतु

भजन करणाऱ्यासाठी हा काळ फारच उत्तम आहे. ॥ ७२१ ॥

साधकाने प्रत्येक वेळेत सावधान राहिले पाहिजे. सावधान राहण्याचे तात्पर्य आहे—कोणाकडून कधीही कशाचीही अपेक्षा न करणे. ॥ ७२२ ॥

साधक तो आहे जो चोवीस तास साधन करतो. ॥ ७२३ ॥

छोट्यात-छोटे आणि मोठ्यात-मोठे जे काही कर्म केले जाईल, त्यात साधकाने सावध रहावे की, कोण्या स्वार्थ भावनेने तर कर्म केले जात नाही ना! ॥ ७२४ ॥

माझ्या कोणत्याही क्रियेपासून दुसऱ्याला दुःख पोहचाणार नाही-अशी सावधानी साधकाने नेहमी ठेवली पाहिजे. दुसऱ्यांना दुःख दिल्यास कितीही वर्ष साधन केले तरी शांती मिळत नाही. ॥ ७२५ ॥

साधक जितके जाणतो तितके स्वीकार करून त्याने त्याचे पालन करणे आरंभ करावे. मग पुढचे आवश्यक ज्ञान त्याला आपोआप प्राप्त होते. ॥ ७२६ ॥

शरीर संसारात स्थित आहे आणि स्वयं परमात्म्यात स्थित आहे. म्हणून साधकाने आपल्याला संसारात स्थित न मानता परमात्म्यातच आपल्या स्थितीचा अनुभव करावा. ॥ ७२७ ॥

साधकाने 'काय करावे आणि काय करू नये' हे शास्त्रानुसार आचरावे आणि 'काय व्हावे आणि काय होऊ नये'-हे भगवंतावर सोडून द्यावे. ॥ ७२८ ॥

स्वतःला कधी सिद्ध मानू नये, तर सदा साधकच मानावे. सिद्ध मानल्याने धोकाच होतो. ॥ ७२९ ॥

साधकाचे काम शासन करणे नाही तर तत्त्वज्ञ आणि हितैषी

यांच्या शासनात साधकाने रहावे. ॥ ७३० ॥

साधकाने असा विचार करावा की, जे सुख सदा राहत नाही आणि त्याच्याबरोबर दुःखही आहे ते सुख मला घ्यायचे नाही. ॥ ७३१ ॥

साधनजन्य सुखाचा भोग साधकासाठी विशेष बाधक आहे. ॥ ७३२ ॥

साधकाचा उद्देश (परमार्थाचे) शाब्दिक ज्ञान घेण्याचा नसावा उलट अनुभव करण्याचा असावा. शाब्दीक ज्ञानाने तो विद्वान्, वक्ता, लेखक तर होऊ शकतो, परंतु तत्त्वज्ञ, जीवन्मुक्त, भगवत्प्रेमी होऊ शकत नाही. ॥ ७३३ ॥

जो आरंभाकडे दृष्टी टाकतो तो असाधक असतो आणि जो परिणामाकडे पाहतो, तो साधक असतो. ॥ ७३४ ॥

'मी साधक आहे'—हे जर अभिमानाचा अंगीकार करून असेल तर बाधक आहे आणि जर स्वाभिमानाचा (कर्तव्याचा) अंगीकार करून असेल तर सहायक आहे. मी साधक आहे आणि दुसरा असाधक आहे—हा अभिमान आहे आणि मी साधन-विरुद्ध कार्य कसे करू शकतो—हा स्वाभिमान आहे. ॥ ७३५ ॥

साधकाने सत्य तत्त्वाचे अनुयायी व्हावे, कोण्या व्यक्ती, सांप्रदाय इत्यादीचे अनुयायी होऊ नये. ॥ ७३६ ॥

## ( ४६ ) साधन

केवळ नाम-जप करणे हेच भजन नाही तर भगवत् अनुकूल ज्या कोणत्याही क्रिया आणि भावामुळे भगवंताकडे आकर्षण वाढेल, ते सर्व भजनच आहे. ॥ ७३७ ॥

केवळ एका भगवत्प्राप्तीचा उद्देश झाल्यास सर्व क्रिया साधन बनतात. ॥ ७३८ ॥

संसाराचे कार्य तर निर्लिप्त होऊन, केवळ कर्तव्य समजून केले पाहिजे. परंतु भगवंताचे कार्य (जप, ध्यान इत्यादी) तल्लीन होऊन, आपली वस्तु समजून केले पाहिजे. ॥ ७३९ ॥

साधकाने अंत:करणातून असे मानावे की, 'मी भगवंताचाच आहे आणि भगवंतच माझे आहेत' मग त्याच्याद्वारा स्वत: स्वाभाविक साधन होईल. ॥ ७४० ॥

रात्रंदिवस भगवंताच्या भजन-ध्यानात तल्लीन राहणाऱ्या व्यक्ती-कडून संसाराचे जे हित होते, ते रात्रंदिवस कर्म करणाऱ्यांकडून होत नाही. ॥ ७४१ ॥

मला केवळ परमात्म्याचीच प्राप्ती करायची आहे-अशी निश्चयात्मिका बुद्धी संपूर्ण साधनांचे मूळ आहे. परंतु संसाराला स्थिर मानल्याने अशी बुद्धी उत्पन्न होत नाही. ॥ ७४२ ॥

आपल्या साधनेच्या बळाचा अभिमान असल्यानेच आपल्यात उणीवेची चिंता होते. ॥ ७४३ ॥

कोणतेही साधन पूर्णतेला पोहेचल्यावर जगण्याची इच्छा, मरण्याचे भय, प्राप्तीची लालच आणि करण्याची आसक्ती-हे चारी सर्वथा समाप्त होतात. ॥ ७४४ ॥

जड पदार्थांशी जीवाचा जो आसक्तियुक्त संबंध आहे, त्याला समाप्त करण्यातच संपूर्ण साधनांची सार्थकता आहे. ॥ ७४५ ॥

अभ्यासाचे नाव भजन नाही तर भगवंताची स्मृती आणि प्रियतेचे नाव भजन आहे. भगवंताला आपले मानल्याविना स्मृती आणि प्रियता जागृत होत नाही. ॥ ७४६ ॥

साधन स्वद्वारा होते मन-बुद्धी इंद्रियांद्वारा नव्हे. ॥ ७४७ ॥

परमात्मप्राप्तीची जितकी काही साधने आहेत, त्या सर्वसाधनांना परमात्मप्राप्तीपेक्षाही अधिक आदर दिला पाहिजे. ॥ ७४८ ॥

साधनेत विशेष आदरबुद्धी झाल्यास साधन वेगाने होते. साधनेला जितका आदर दिला पाहिजे तितका आदर न देण्यानेच साधनेत शिथिलता येते आणि सफलताही प्राप्त होत नाही. ॥ ७४९ ॥

भगवंताकडे नेणारी सर्व साधने 'स्वधर्म' आहेत आणि संसाराकडे आकर्षित करणारी सर्वकर्म 'परधर्म' आहेत. ॥ ७५० ॥

जो दुसऱ्याला दुःख देतो, त्याचे भजनात मन लागत नाही. ॥ ७५१ ॥

जशी परिस्थिती येईल त्यातच साधन करायचे आहे. अनुकूलता पाहत बसाल तर साधन होणार नाही. ॥ ७५२ ॥

संपूर्ण साधनांचे सार आहे—संसाराशी संबंध-विच्छेद करणे आणि भगवंताशी असलेला आपला संबंध ओळखणे. ॥ ७५३ ॥

संसारापासून उपरती आणि भगवंतात प्रीती होण्यासाठीच सर्व साधने आहेत. ॥ ७५४ ॥

कितीही श्रेष्ठ अवस्था प्राप्त झाली तरी आपल्या साधनेत कधी संतुष्ट राहू नये. ॥ ७५५ ॥

जी परिस्थिती समोर येईल त्यातच प्रसन्न राहणे 'भजन' आहे. ॥ ७५६ ॥

भगवंताचे भजन करतेवेळी संसाराचे स्मरण करू नये आणि संसाराचे काम करतेवेळी भगवंताचे विस्मरण होऊ देऊ नये. ॥ ७५७ ॥

आपल्यासाठी जप, तप, ध्यान इत्यादी करणे असुरपणा आहे आणि दुसऱ्यांच्या हितासाठी जप, तप, ध्यान इत्यादी करणे मानवता आहे. ॥ ७५८ ॥

जसे व्यापार तो उत्तम असतो ज्यात अधिक पैसा मिळतो, तसेच साधन ते उत्कृष्ट असते ज्यात मन भगवंतात अधिक लागते. ॥ ७५९ ॥

जे साधन सुगम वाटेल, ते करणे प्रारंभ करा म्हणजे जे कठीण वाटेल ते सुगम होईल आणि जे समजत नाही ते समजू लागेल. ॥ ७६० ॥

करणाची साहय्याता असली तर चालेल परंतु करणाची अपेक्षा नसावी—हे करणनिरपेक्ष साधन आहे. ॥ ७६१ ॥

जे बालपणी आणि तारुण्यात भजन-साधन करीत नाहीत, ते बहुधा वृद्धापकाळातही भजन-साधन करू शकत नाहीत. ॥ ७६२ ॥

साधन नित्यकर्माप्रमाणे कोणत्या एका निश्चित वेळेत होत नाही, तर निरंतर होत राहते. ॥ ७६३ ॥

मी शरीर नाही, तर शरीरी (शरीर धारण करणारा) आहे-असे योग्य समजून आले तर सर्वच साधने सुगम होतील. ॥ ७६४ ॥

खरे साधन ते असते जे निरंतर (प्रत्येक तासात, प्रत्येक मिनिटात) होते. निरंतर साधन झाल्याविना या जन्मात सिद्धी होऊ शकत नाही. ॥ ७६५ ॥

जर भगवंताचे स्मरण आपोआप होत नाही, भगवंतास आठवावे लागते तर समजावे की, अद्याप साधन सुरू झालेच नाही! ॥ ७६६ ॥

संसाराशी संबंध ठेवून कितीही साधन करा, वर्तमानात सिद्धी होणार नाही. ॥ ७६७ ॥

लगन लागल्यावर साधन आपोआप होते आणि लगन न लागल्यास साधन करावे लागते. जे आपोआप होते ते असली असते आणि जे करावे लागते ते नकली असते. ॥ ७६८ ॥

काम-धंदा करतेवेळी भगवंताचे विस्मरण तेव्हाच होते जेव्हा

साधक काम-धंद्याला आपले आणि आपल्यासाठी मानतो. ॥ ७६९ ॥

वास्तविक साधन क्रिया नाही. क्रिया आणि पदार्थ तर असाधनात मुख्य असतात. साधनेत भाव आणि विवेक मुख्य आहे. ॥ ७७० ॥

सर्वच साधने कल्याण करणारी आहेत. परंतु ज्या साधनेत आपली रुची, श्रद्धा-विश्वास आणि योग्यता असेल, तेच साधन आपल्यासाठी श्रेष्ठ आहे. ॥ ७७१ ॥

## (४७) सुखभोग आणि संग्रह

लोकांची सांसारिक भोग आणि संग्रह यांमध्ये जसजशी आसक्ती वाढते, तसतसा समाजात अधर्म वाढतो आणि जस-जसा अधर्म वाढतो तस-तसे समाजात पापाचरण, कलह, विद्रोह इत्यादी दोष वाढतात. ॥ ७७२ ॥

कोणताही भोग भोगाअंती त्याची अरुची अवश्य होते—हा नियम आहे. परंतु मनुष्य चूक ही करतो की, तो त्या अरुचीला महत्त्व देऊन स्थायी बनावित नाही. ॥ ७७३ ॥

भोगी व्यक्ती दुःखापासून आपला बचाव करू शकत नाही. कारण भोग जडतेच्या संबंधाने होतो आणि जडतेचा संबंध हाच जन्म-मरणरूप महान् दुःखाचे कारण आहे. ॥ ७७४ ॥

साधारण मनुष्याला ज्या भोगात सुख प्रतीत होते, त्या भोगांना विवेकशील पुरष दुःखरूपच समजतो. म्हणून तो त्या भोगात रमण करीत नाही, त्यांच्या अधीन होत नाही. ॥ ७७५ ॥

जोपर्यंत सांसारिक सुख घेण्याची वृत्ती समाप्त होत नाही, तोपर्यंत कितीही वाचा-लिहा, कितीही हुशार आणि समजदार बना, कितीही योग्यता संपादन करा, कितीही व्याख्याने द्या, कितीही पुस्तके लिहा परंतु परमशांती मिळणार नाही. ॥ ७७६ ॥

सांसारिक पदार्थांच्या संयोगाने होणारे सुख आपले नाही किंवा आपल्या साठीही नाही. कारण आपण तर सदा राहणारे आहोत आणि सुख नष्ट होणारे आहे. ॥ ७७७ ॥

लोकात भोग आणि संग्रहाची वृत्ती अधिक झाल्यानेच दुष्काळ पडतो. ॥ ७७८ ॥

आपल्यजवळ जे काही वस्तू, योग्यता, सामर्थ्य इत्यादी आहे ते सर्व समाजाचेच आहे, आपले नाही. आपल्याकडून चूक ही होते की, त्या वस्तू इत्यादींना आपली मानून त्यापासून सुख भोगतो . म्हणून आपल्याला विवश होऊन दुःख भोगावे लागते. ॥ ७७९ ॥

जेथे लौकिक सुख मिळत असलेले दिसेल तेथे समजून घ्यावे की, काहीतरी धोका आहे! ॥ ७८० ॥

वस्तू, व्यक्तीपासून सुख घेणे महान् जडता आहे. ॥ ७८१ ॥

सांसारिक भोगांचे सुख आरंभी तर गोड लागते, परंतु परिणामी ते विषासारखे सर्वथा अनर्थकारी असते. ॥ ७८२ ॥

मनुष्य मिळालेल्या वस्तूंचा भोगही घेऊ शकतो आणि त्यापासून दुसऱ्यांची सेवाही करू शकतो. भोग घेतल्याने पतन होते आणि सेवा केल्याने उत्थान होते. ॥ ७८३ ॥

आपल्या इच्छेने सुख भोगणाऱ्याला आपल्या इच्छेविरुद्ध दुःख भोगावेच लागेल. ॥ ७८४ ॥

वस्तूला दुसऱ्याच्या हितात लावणे तिचा सदुपयोग आहे आणि आपल्या भोगात लावणे तिचा दुरुपयोग आहे. ॥ ७८५ ॥

जो सुखबुद्धीने कोणत्याही वस्तू, व्यक्ती, परिस्थिती, अवस्था इत्यादींचा भोग घेतो, त्यात भगवत्प्राप्तीची व्याकुळता जागृत होत नाही. ॥ ७८६ ॥

जोपर्यंत मनुष्य संसारापासून सुख घेत राहतो तोपर्यंत तो दुःखापासून सुटू शकत नाही. मग तो साधू, गृहस्थी इत्यादी कोणी का असेना! ॥ ७८७ ॥

सांसारिक सुख मिळो अथवा न मिळो, ज्याची सांसारिक सुखात रुची आहे तो पतनाकडे जाणारच! ॥ ७८८ ॥

मनुष्य जितके सुख भोगेल तितकाच तो सुखाचा दास बनेल आणि जितका सुखाचा दास बनेल तितकेच तो दुःख भोगेल. म्हणून सुख भोगाचा त्याग अत्यंत आवश्यक आहे. ॥ ७८९ ॥

ज्याच्या बुद्धीत जडतेचेच (सांसारिक भोग आणि संग्रहाचेच) महत्त्व आहे, असा मनुष्य कितीही विद्वान् असला तरी त्याचे पतन अवश्यंभावी आहे. परंतु ज्याच्या बुद्धीत जडतेचे महत्त्व नाही आणि भगवत्प्राप्ती हाच ज्याचा उद्देश आहे, असा मनुष्य जरी विद्वान् नसला तरीही त्याचे उत्थान अवश्यंभावी आहे. ॥ ७९० ॥

आपण ज्याच्यापासून सुख घेऊ त्याचा दास व्हावेच लागेल. सुखाचा भोगी कधी स्वाधीन होऊ शकत नाही. ॥ ७९१ ॥

आपल्याला सुखभोगी व्हायचे नाही तर सुखदायी व्हायचे आहे. ॥ ७९२ ॥

योग असो अथवा भोग असो कोणाकडूनही मनुष्य सुख घेऊ इच्छित असेल, तर त्यातच तो फसतो. ॥ ७९३ ॥

## (४८) सुख आणि दुःख

सांसारिक वस्तूंसाठी होणाऱ्या दुःखाची भगवान् परवा करीत नाहीत आणि भगवंतासाठी होणारे (खरे) दुःख भगवान् सहन करू शकत नाहीत. ॥ ७९४ ॥

भगवंताच्या मंगलमय विधानानुसार जी अनुकूल (सुखदायी)

अथवा प्रतिकूल (दु:खदायी) परिस्थिती येते, ती आपल्या हितासाठीच येते. ॥ ७९५ ॥

सुखी दु:खी होणे प्रारब्धाचे फल नाही, तर मूर्खपणाचे फल आहे. हा मूर्खपणा सत्संगाने नाहीसा होतो. ॥ ७९६ ॥

साधकाने सदा लोभी व्यक्तीप्रमाणे दुसऱ्याच्या सुखासाठी उत्कंठित रहावे. असे झाल्यास तो सुख-दु:खातीत होईल. ॥ ७९७ ॥

आपल्या सुखासाठी प्रयत्न करणे, दु:खाला निमंत्रण देणे आहे आणि दुसऱ्यांच्या सुखासाठी प्रयत्न करणे आनंदाला निमंत्रण देणे आहे. ॥ ७९८ ॥

सुखदायी आणि दु:खदायी परिस्थिती येणे हे तर कर्माचे फल आहे. परंतु त्यापासून सुखी-दु:खी होणे आपल्या अज्ञानाचे, मूर्खपणाचे फल आहे. कर्मांचे फल नष्ट करणे तर हातातीली गोष्ट नाही, परंतु मूर्खपणा नष्ट करणे बिलकुल हातातीली गोष्ट आहे. ॥ ७९९ ॥

जो सुखदायी परिस्थितीत दुसऱ्यांची सेवा करतो तसेच दु:खदायी परिस्थितीत दु:खी होत नाही अर्थात् सुखाची इच्छा करीत नाही, तो संसार बंधनातून सुगमतापूर्वक मुक्त होतो. ॥ ८०० ॥

प्रकृतिजन्य सुखाची आसक्ती झाल्यास सुख-दु:खाच्या परंपरेचा अंत होत नाही. ॥ ८०१ ॥

वास्तविक अनुकूलतेने सुखी होणे हेच प्रतिकूलतेत दु:खी होण्याचे कारण आहे. कारण परिस्थिती जन्य सुख भोगणारा कधी दु:खापासून वाचू शकतच नाही. ॥ ८०२ ॥

सुखाच्या इच्छेचा त्याग करविण्यासाठीच दु:ख येते. ॥ ८०३ ॥

जो दुसऱ्यांपासून (आपल्यासाठी) सुख इच्छितो, त्याला भयंकर दु:ख भोगावेच लागेल. ॥ ८०४ ॥

दु:खाला कारण आपण स्वत:च असतो दुसरे कोणी नाही.

जोपर्यंत आपण दुसऱ्याला दुःखाचे कारण मानतो, तोपर्यंत आपले दुःख समाप्त होऊच शकत नाही. ॥ ८०५ ॥

आपल्या सुखाने सुखी होणाऱ्याला दुःखी व्हावेच लागेल आणि दुसऱ्याच्या सुखाने सुखी होणाऱ्याचे दुःख नेहमीसाठी समाप्त होईल. ॥ ८०६ ॥

शरीराला 'मी' आणि 'माझे' मानणे हेच संपूर्ण दुःखाचे कारण आहे. ॥ ८०७ ॥

जोपर्यंत संसाराचे सुख घेत रहाल तोपर्यंत प्रकृतीचा संबंध सुटणार नाही. ॥ ८०८ ॥

वस्तूच्या अभावाने दुःख होत नाही, तर वस्तू मिळावी—या इच्छेने दुःख होते. ॥ ८०९ ॥

वस्तूंमुळे दुःख समाप्त होत नाही. कारण दुःख विवेकाच्या अभावाने उत्पन्न होते, वस्तूंच्या नव्हे. म्हणून विवेकाने दुःख समाप्त होते. ॥ ८१० ॥

सुख निर्विकल्पतेत आहे, भोगात नाही. ॥ ८११ ॥

जेथे कोठे संसाराचे सुख दिसेल, तेथे विवेक विचारपूर्वक पाहिले तर तेथेच दुःख दिसू लागेल. कारण संसार दुःखरूपच आहे-'**दुःखालयम्**'। (गीता ८। १५) ॥ ८१२ ॥

ऐकू इच्छिता म्हणून ऐकण्याचे दुःख होते. पाहू इच्छिता म्हणूनच न दिसल्याचे दुःख होते. बल इच्छिता म्हणूनच निर्बलतेचे दुःख होते. तारुण्य इच्छिता म्हणूनच वृद्धावस्थेचे दुःख होते. तात्पर्य, वस्तूच्या अभावामुळे दुःख होत नाही, तर त्याच्या अपेक्षेने त्याच्या अभावाचा अनुभव करण्याने दुःख होते. ॥ ८१३ ॥

संसाराशी संबंध जोडाल तर दुःखांचा अंत नाही आणि

भगवंताशी संबंध जोडाल तर सुखांचा (आनंदाचा) अंत नाही. ॥ ८१४ ॥

सुख इच्छित असाल तर दुसऱ्यांना सुख द्या. जसे बीज पेराल तसेच पीक येईल. ॥ ८१५ ॥

जर लौकिक सुख मिळत असलेले दिसले तर समजून घ्या की, काहीतरी धोका आहे! ॥ ८१६ ॥

सर्वकाही परमात्माच आहे-'**वासुदेवः सर्वम्**' परंतु ते भोग्य नाहीत. जो त्यांना भोग्य मानून सुख घेऊ इच्छितो, तो दुःख भोगत राहतो. ॥ ८१७ ॥

गृहस्थींमध्ये जर सर्वांचा हा भाव राहिला की, मला सुख कसे मिळेल तर सर्वजण दुःखी होतील आणि जर हा भाव राहीला की, दुसऱ्यांना सुख कसे मिळेल तर सर्वजण सुखी होतील. ॥ ८१८ ॥

जर दुःख इच्छित नसाल तर सांसारिक सुखाची इच्छा करू नका. ॥ ८१९ ॥

दुसरे सुखी व्हावेत-हा भाव राहिला तर सर्वच सुखी होतील आणि स्वतःही सुखी व्हाल. मी सुखी व्हावे—हा भाव राहिला तर सर्वच दुःखी होतील आणि स्वतःही दुःखी व्हाल. ॥ ८२० ॥

सांसारिक सुख का टिकत नाही कारण ते आपले आणि आपल्यासाठी नाहीच. ॥ ८२१ ॥

सुख चांगले वाटते परंतु त्याचा परिणाम चांगला नसतो. दुःख वाईट वाटते परंतु त्याचा परिणाम चांगला होतो. ॥ ८२२ ॥

दुःखदायी परिस्थिती भगवंताच्या विधानानुसार आपल्या कल्याणासाठी येते. म्हणून तिला नष्ट करण्याचा प्रयत्न न करता शांतीपूर्वक सहन करावे. ॥ ८२३ ॥

जो दुसऱ्यांचे अनिष्ट करतो तो वास्तविक आपलेच अनिष्ट

करतो आणि जो दुसऱ्यांना सुख पोहचवितो तो वास्तविक आपल्यालाच सुखी करतो. ॥ ८२४ ॥

दुःख प्राप्त झाल्यावर प्रसन्न होणे हे फार मोठे साधन आहे. ॥ ८२५ ॥

परिस्थिती पासून रहित होण्यास मनुष्य स्वतंत्र नाही, परंतु तिचा भोग न घेण्यास अर्थात् सुखी-दुःखी न होण्यास मनुष्य सर्वथा स्वतंत्र, समर्थ आणि सबल आहे. ॥ ८२६ ॥

जोपर्यंत अनुकूलता-प्रतिकूलतेचा परिणाम होतो, तोपर्यंत कर्मयोग, ज्ञानयोग, भक्तियोग इत्यादी कोणताही योग सिद्ध झाला नाही. ॥ ८२७ ॥

संसार कधी कोणाला दुःख देत नाही, तर त्याच्याशी संबंधच दुःख देतो. ॥ ८२८ ॥

सांसारिक सुखाने कधी सांसारिक दुःख समाप्त होऊ शकत नाही— हा नियम आहे. ॥ ८२९ ॥

संसाराची प्राप्ती झाल्यावर तृष्णा वाढते आणि दुःख होते. परंतु परमात्म्याची प्राप्ती झाल्यावर प्रेम वाढते आणि आनंद होतो. ॥ ८३० ॥

दुःख भोगणारा तर पुढे सुखी होऊ शकतो परंतु दुःख देणारा कधी सुखी होऊ शकत नाही. ॥ ८३१ ॥

जो सुख घेण्याच्या इच्छेने कोणाशी संबंध जोडीत नाही तो जगतो तर आनंदाने जगतो आणि मरतो तर आनंदाने मरतो. परंतु घेण्याचा इच्छेने संबंध जोडणारा जगत असतानाही दुःखी होतो आणि मरतानाही दुःखी होतो. ॥ ८३२ ॥

जसे माणसाला पाण्याची तहान दुःख देते, पाणी दुःख देत नाही, तसेच संसाराची सुखासक्तीच दुःख देते, संसार दुःख देत नाही. ॥ ८३३ ॥

# ( ४९ ) सेवा ( परहित )

दुसऱ्यांचे अहित करण्याने आपले अहित आणि दुसऱ्यांचे हित करण्याने आपले हित होते—हा नियम आहे. ॥ ८३४ ॥

संसाराचा संबंध 'ऋणानुबंध' आहे. या ऋणानुबंधानातून मुक्त होण्याचा उपाय आहे—सर्वांची सेवा करणे आणि कोणाकडून काही न इच्छिणे. ॥ ८३५ ॥

जो साधक परमात्म्याच्या सगुण अथवा निर्गुण कोणत्याही रुपाची प्राप्ती इच्छितो त्याने संपूर्ण प्राण्यांच्या हितात रत राहणे अत्यंत आवश्यक आहे. ॥ ८३६ ॥

साधकाला संसाराच्या सेवेसाठीच संसारात राहायचे आहे, आपल्या सुखासाठी नव्हे. ॥ ८३७ ॥

अंत:करणापासून भगवंताच्या सेवेत लागलेल्या साधकारा सर्व प्राण्यांची सेवा होते. कारण सर्वांचे मूळ भगवंतच आहेत. ॥ ८३८ ॥

साधकाने आपल्यावर आलेले मोठ्यातले-मोठे दु:खही सहन केले पाहिजे आणि दुसऱ्यावर आलेले लहानातील-लहान दु:ख सुद्धा सहन करू नये. ॥ ८३९ ॥

दुसऱ्यांना सुख पोहचविण्याच्या इच्छेने आपली सुखेच्छा समाप्त होते. ॥ ८४० ॥

कोणालाही किंचिन्मात्रही दु:ख होऊ नये—हा भाव महान् भजन आहे. ॥ ८४१ ॥

जसा माणूस ऑफिसला गेल्यावर तेथे केवळ ऑफिसचेच काम करतो, तसेच या संसारात येऊन केवळ संसारासाठीच काम करायचे आहे, आपल्यासाठी नव्हे. मग सुगमतापूर्वक संबंध-विच्छेद आणि नित्यप्राप्त परमात्म्याचा अनुभव होईल. ॥ ८४२ ॥

वेळ, समज, सामुग्री आणि सामर्थ्य—या चारींना आपल्यासाठी मानणे हा त्यांचा दुरुपयोग आहे आणि दुसऱ्यांच्या हितात लावणे हा त्यांचा सदुपयोग आहे. ॥ ८४३ ॥

संयोगजन्य सुख प्राप्त होण्याने जी प्रसन्नता होते, तीच प्रसन्नता जर दुसऱ्यांना सुख पोहचविण्याने होऊ लागली तर मग कल्याणात संदेह नाही. ॥ ८४४ ॥

आपल्याला जी सुख-सुविधा मिळाली आहे ती संसाराची सेवा करण्यासाठीच मिळाली आहे. ॥ ८४५ ॥

मनुष्यशरीर आपल्या सुख-भोगासाठी मिळालेले नाही, तर सेवा करण्यासाठी, दुसऱ्यांना सुख देण्यासाठी मिळाले आहे. ॥ ८४६ ॥

माणसाला भगवंतांनी इतका मोठा अधिकार दिला आहे की, तो जीव-जंतूंची, माणसांची, ऋषी-मुनींची, संत-महात्म्यांनी, देवतांची, पितरांची, भूत-प्रेतांची, सर्वांची सेवा करू शकतो. एवढेच नव्हे तर तो साक्षात् भगवंताचीही सेवा करू शकतो. ॥ ८४७ ॥

संसाराची सेवा केल्याशिवाय कर्म करण्याची आसक्ती निवृत्त होत नाही. ॥ ८४८ ॥

जसे एखाद्या कंपनीचे काम उत्कृष्ट करण्याने त्याचा मालक प्रसन्न होतो, तसेच संसाराची सेवा करण्याने त्याचे मालक भगवान् प्रसन्न होतात. ॥ ८४९ ॥

जसे मातेचे दूध तिच्यासाठी नसून बालकासाठीच असते, तसेच मनुष्याजवळ जी काही सामुग्री आहे, ती त्याच्या स्वत:साठी नसून दुसऱ्यांसाठीच आहे. ॥ ८५० ॥

जसे भोगी पुरुषाची भोगात, मोही पुरुषाची कुटुंबात आणि लोभी पुरुषाची धनात रती राहते, तसेच श्रेष्ठ पुरुषांची प्राणीमात्रांच्या

हितात रती राहते. ॥ ८५१ ॥

व्यक्तींची सेवा करायची आहे आणि वस्तूंचा सदुपयोग करायचा आहे. ॥ ८५२ ॥

केवळ दुसऱ्यांच्या हितासाठी कर्म करण्याने कर्माचा प्रवाह संसाराकडे होतो आणि साधक कर्मबंधनापासून मुक्त होतो. ॥ ८५३ ॥

जे सर्वत्र परिपूर्ण असलेल्या परमात्मतत्त्वाशी अभिन्नतेचा अनुभव करू इच्छितात, त्यांच्यात प्राणीमात्राच्या हितात प्रीती होणे आवश्यक आहे. ॥ ८५४ ॥

स्थूल, सूक्ष्म आणि कारण-तिही शरीरांनी केले जाणारे तीर्थ, व्रत, दान, तप, चिंतन, ध्यान, समाधी इत्यादी समस्त शुभ कर्म सकामभावाने अर्थात् आपल्यासाठी केल्यास 'परधर्म' होतात आणि निष्कामभावाने अर्थात् दुसऱ्यांसाठी केल्यास 'स्वधर्म' होतात. ॥ ८५५ ॥

वस्तूचा सर्वात उत्तम उपयोग आहे-तिला दुसऱ्याच्या हितात लावणे. ॥ ८५६ ॥

श्रेष्ठ पुरुष तोच आहे, जो दुसऱ्यांच्या हितात लागून आहे. ॥ ८५७ ॥

आपले जीवन आपल्यासाठी नाही, तर दुसऱ्यांच्या हितासाठी आहे. ॥ ८५८ ॥

दुसऱ्याच्या दुःखाने दुःखी होणे सेवेचे मूळ आहे. ॥ ८५९ ॥

उपकार करण्याने समाजाची सेवा होते. अपकार-रहित झाल्याने संपूर्ण विश्वाची सेवा होते. कामनारहित झाल्याने आपली सेवा होते. भगवंताशी प्रेम (आत्मीयता) करण्याने भगवंताची सेवा होते. ॥ ८६० ॥

जो प्रामाणिक अंतःकरणाने भगवंताकडे अग्रेसर होतो, त्याच्याद्वारा स्वाभाविक दुसऱ्यांचे हित होत असते. ॥ ८६१ ॥

संसारापासून मिळालेली वस्तू केवळ संसाराची सेवा करण्यासाठीच आहे, दुसऱ्या कोणत्याही कामाची नाही. ॥ ८६२ ॥

कोणती वस्तू आपणाला चांगली वाटते तर ती भोगण्यासाठी नाही, तर सेवा करण्यासाठी आहे. ॥ ८६३ ॥

मनुष्याने असे काम करावे ज्यामुळे त्याचेही हित व्हावे आणि संसाराचेही हित व्हावे, आत्ताही हित व्हावे आणि परिणामीही हित व्हावे. ॥ ८६४ ॥

शरीराची सेवा कराल तर संसाराशी संबंध जुळेल आणि (भगवंतासाठी) संसाराची सेवा कराल तर भगवंताशी संबंध जुळेल. ॥ ८६५ ॥

ज्याच्या अंतःकरणात सर्वांच्या हिताचा भाव राहतो, तो भगवंताच्या हृदयात स्थान प्राप्त करतो. ॥ ८६६ ॥

परमार्थ बिघडला नाही तर व्यवहार बिघडला आहे. म्हणून व्यवहार योग्य करायचा आहे. व्यवहार योग्य होईल—स्वार्थ आणि अभिमानाचा त्याग करून दुसऱ्यांची सेवा करण्याने ॥ ८६७ ॥

दुसऱ्यांच्या हिताचा भाव ठेवणारा कुठेही राहो, तेथेचे भगवत्प्राप्ती करेल. ॥ ८६८ ॥

भगवंताच्या सन्मुख होण्यासाठी संसारापासून विन्मुख व्हायचे आहे आणि संसारापासून विन्मुख होण्यासाठी निष्कामभावाने दुसऱ्यांची सेवा करायची आहे. ॥ ८६९ ॥

सेवेसाठी वस्तूची कामना करणे चूक आहे. जी वस्तू मिळालेली आहे तिनेच सेवा करण्याचा अधिकार आहे. ॥ ८७० ॥

संसारात दुसऱ्यांसाठी जसे कराल, परिणामी तसेच आपल्यासाठी होईल. म्हणून दुसऱ्यांसाठी नेहमी चांगलेच करा. ॥ ८७१ ॥

जो आपल्या स्वार्थ आणि अभिमानाचा त्याग करून केवळ दुसऱ्यांच्या हितात लागलेला आहे, त्याचेच जगणे हे वास्तविक जगणे आहे. ॥ ८७२ ॥

जे सेवा घेऊ इच्छितात त्यांच्यासाठी तर वर्तमान समय फार वाईट आहे, परंतु जे सेवा करू इच्छितात, त्यांच्यासाठी वर्तमान समय फार उत्कृष्ट आहे. ॥ ८७३ ॥

आपल्या कोणत्याही क्रियेने कोणाला किंचिन्मात्र ही दुःख होऊ नये—हा भाव 'सेवा' आहे. ॥ ८७४ ॥

निःस्वार्थभावाने दुसऱ्यांची सेवा करण्याने व्यवहारही उत्कृष्ट होतो आणि ममताही समाप्त होते. ॥ ८७५ ॥

परिवाराची सेवा करण्याने मोह होतच नाही. ''मोह होतो तो काहीना काही घेण्याच्या इच्छेने''॥ ८७६ ॥

भगवंताला प्राप्त करून मनुष्य संसारावर जितके उपकार करू शकतो, तितका कोणत्याही दान-पुण्याने करू शकत नाही. ॥ ८७७ ॥

जो आपल्याशी द्वेष करतो, त्याची सेवा करण्याने अधिक लाभ होतो, कारण तेथे सेवेचा सुखभोग होत नाही. ॥ ८७८ ॥

कधी सेवेचा अवसर मिळाला तर आनंद मानला पाहिजे की, भाग्य उदयाला आले!॥ ८७९ ॥

संपूर्ण प्राण्यांच्या हिताहून आपले हित वेगळे मानल्यने अहम् कायम राहतो, जो साधकासाठी पुढे बाधक होतो. म्हणून साधकाने प्रत्येक क्रिया संसाराच्या हितासाठीच करावी. ॥ ८८० ॥

## (५०) स्वभाव

स्वार्थ आणि अभिमान-या दोन विकारांनी स्वभाव बिघडतो. म्हणून साधकाने स्वार्थ आणि अभिमानाचा सर्वथा त्याग केला पाहिजे. ॥ ८८१ ॥

भजन, ध्यान इत्यादी साधन करूनही वर्तमानात प्रत्यक्ष लाभ न दिसण्याचे कारण आहे— स्वभावाचे शुद्ध न होणे. म्हणून प्रत्येक साधकाने आपला स्वभाव सुधारण्याकडे विशेष लक्ष दिले पाहिजे. ॥ ८८२ ॥

आपला स्वभाव शुद्ध बनविण्यासारखी कोणतीही उन्नती नाही. ॥ ८८३ ॥

ज्याचा स्वभाव सुधरेल त्याच्यासाठी संसार सुधरून जाईल. ॥ ८८४ ॥

ज्याचा स्वभाव दुसऱ्यांना दु:ख देण्याचा आहे, तो दुसऱ्यांनाही दु:ख देईल आणि स्वत:ही दु:खी होईल. परंतु ज्याचा दुसऱ्यांना सुख देण्याचा आहे, तो दुसऱ्यांनाही सुख देईल आणि स्वत:ही सुखी होईल. ॥ ८८५ ॥

स्वत:च्या स्वभावाची सुधारणा मनुष्य स्वत:च करू शकतो. दुसरा केवळ त्याला उपाय सांगू शकतो, त्याची साहय्यता करू शकतो. ॥ ८८६ ॥

आपला स्वभाव तेव्हा सुधरेल जेव्हा आपण आपल्याशी न्याय करू अर्थात् आपल्यावर शासन करू आणि दुसऱ्याला क्षमा करू. ॥ ८८७ ॥

सत्संग, सच्छास्त्र आणि सद्विचार—या तिन्हीने स्वभावात सुधारणा होते. ॥ ८८८ ॥

ज्याचा स्वभाव शुद्ध बनतो, तो अधोगतीला जाऊ शकत नाही. ॥ ८८९ ॥

'मग करू' ही गोष्ट महान पतन करणारी आहे. अशा स्वभावाच्या व्यक्तीचे कल्याण होणे कठीण आहे. ॥ ८९० ॥

## ( ५१ ) स्वरूप

साधकाने बदलणाऱ्या अवस्थांकडे पाहू नये, तर कधी न

बदलणाऱ्या स्वरूपाला (स्वयंला) पहावे. ॥ ८९१ ॥

स्वरूप निष्काम आहे. सकामभाव प्रकृतीच्या संबंधाने येतो. ॥ ८९२ ॥

शरीरादी सर्वपदार्थ बदलत आहेत—असा ज्याला अनुभव आहे, तो स्वयं कधी बदलत नाही. म्हणून स्वयंच्या बदलण्याचा अनुभव कधी कोणाला होत नाही. ॥ ८९३ ॥

जीव स्वरूपाने अकर्ता तसेच सुख-दुःखरहित आहे. केवळ आपल्या प्रमादामुळे तो कर्ता बनतो आणि कर्मफलाशी संबंध जोडून सुखी-दुःखी होतो. ॥ ८९४ ॥

क्रिया आणि पदार्थाशी संबंध जोडल्यानेच आपल्या स्वरूपाचा साक्षात् अनुभव येत नाही. ॥ ८९५ ॥

आपले शरीर तर संसारात आहे, परंतु आपण स्वयं परमात्म्यातच आहोत. ॥ ८९६ ॥

आपले स्वरूप सत्ता आहे, अहम् नाही. म्हणून अहम्‌चा त्याग करून सत्तेमध्ये आपल्या स्वतःसिद्ध स्थितीचा अनुभव करा. ॥ ८९७ ॥

आपले स्वरूप स्वतःचे आहे, दुसऱ्याचे नाही. जर त्याला जाणणे कठीण असेल तर मग सुगम काय असणार? ॥ ८९८ ॥

आपले अस्तित्व (असणेपणा) वस्तू, व्यक्ती आणि क्रिया यांच्या अधीन नाही. ॥ ८९९ ॥

आपले स्वरूप हे केवळ सत्ता आहे. त्या सत्तेत काहीही मिसळणे अज्ञान आहे, बंधन आहे. ॥ ९०० ॥

आपली सत्ता (स्वरूप) शरीराच्या अधीन नाही, तर शरीराची सत्ता आपल्या अधीन आहे अर्थात् आपण शरीराविना राहू शकतो, परंतु शरीर आपल्याविना राहू शकत नाही. ॥ ९०१ ॥

## (५२) प्रकीर्ण

साधकाच्या अंतःकरणात नेहमी असा भाव असला पाहिजे

की, मी येथील निवासी नाही, तर (भगवंताचा अंश असल्यामुळे) भगवद्धामाचा निवासी आहे. ॥ ९०२ ॥

आपल्या कमाईत कोणाच्या हक्काचा एक कणही येऊ नये— या गोष्टीची पूर्ण सावधगिरी ठेवली पाहिजे. ॥ ९०३ ॥

जेव्हा चेतन जडाशी तादात्म्य करते तेव्हा परिच्छिन्नता अर्थात् अहंता उत्पन्न होते. अहंतेपासून 'ममता' उत्पन्न होते, ज्यामुळे विकार उत्पन्न होतात. ममतेपासून 'कामना' उत्पन्न होते, ज्यामुळे अशांती निर्माण होते. ॥ ९०४ ॥

साधकाने असे मानावे की, मी जे काही करतो, ती भगवंताची पूजा आहे आणि जे काही होत आहे ती भगवंताची लीला आहे. ॥ ९०५ ॥

आता मनुष्य पशूपेक्षाही निकृष्ट गतीला जात आहे. कारण पशू तर आपल्या निर्वाहाची वस्तूच घेतो, दुसऱ्यांचा हक्क मारीत नाही. परंतु मनुष्य दुसऱ्यांचाही हक्क मारुन संग्रह करतो. ॥ ९०६ ॥

शरीराच्या आवश्यकतांच्या पूर्तीची व्यवस्था तर परमात्म्याकडून होते. परंतु भोगेच्छा पूर्तीसाठी कोणतीही व्यवस्था नाही. ॥ ९०७ ॥

साधक जेव्हा आपल्या दोषांना दोषरूपाने पाहून त्यांच्या दुःखाने दुःखी होतो, त्यांचे राहणे त्याला असह्य होते, तेव्हा त्याचे दोष राहू शकत नाहीत. भगवंताची कृपा त्या दोषांना तात्काळ नष्ट करून टाकते. ॥ ९०८ ॥

नेत्रांपेक्षा अधिक स्मृती मनाला राहते, मनापेक्षा अधिक स्मृती बुद्धीला राहते आणि बुद्धीपेक्षा अधिक स्मृती स्वयंला राहते. स्वयं ज्या गोष्टीला पकडतो, ती गोष्ट प्रत्येक क्षणी स्मृतीत राहते. ॥ ९०९ ॥

आपापल्या स्थानात अथवा क्षेत्रात जे पुरष मुख्य म्हणविले जातात, त्या अध्यापक, व्याख्यानदाता, आचार्य, गुरू, नेता,

शासक, महन्त, कथावाचक, पुजारी इत्यादी सर्वांनी आपल्या आचरणात विशेष सावधगिरी बाळगण्याची अत्यंत आवश्यकता आहे, ज्यामुळे दुसऱ्या लोकांवर त्याचा चांगला प्रभाव पडतो. ॥ ९१० ॥

करू इच्छित असाल तर सेवा करा, जाणू इच्छित असाल तर आपले आपणाला जाणा आणि मानू इच्छित असाल तर प्रभूला माना. तिन्हीचा परिणाम एकच होईल. ॥ ९११ ॥

जसे पेन उत्कृष्ट असल्यास लिखाण तर उत्तम होऊ शकते, परंतु त्यामुळे लेखक उत्कृष्ट होत नाही, तसेच करण (अंत:करण) शुद्ध झाल्यास क्रिया शुद्ध होऊ शकते, परंतु त्यापासून कर्ता शुद्ध होत नाही. ॥ ९१२ ॥

लोक आपल्याला जितके चांगले समजतात, तितके आपण चांगले नसतो आणि लोक आपल्याला जितके वाईट समजतात, त्यापेक्षा आपण अधिक वाईट असतो—या वास्तविकतेला समजून 'लोकांनी आपल्याला चांगले समजावे'—या इच्छेचा त्याग करावा आणि आपल्या दृष्टीने चांगल्यात चांगले बनण्याचा प्रयत्न करावा. ॥ ९१३ ॥

संयोगजन्य सुखाची लालसा जितकी घातक आहे, तितके सुख घातक नाही. शरीर कायम राहवे—हा भाव जितका घातक आहे, तितके शरीर घातक नाही. कुटुंबाचा मोह जितका घातक आहे तितके कुटुंब घातक नाही. रुपयाचा लोभ जितका घातक आहे तितके रुपये घातक नाहीत. ॥ ९१४ ॥

जे दिसत आहे, त्या संसाराला आपले मानायचे नाही, तर त्याची सेवा करायची आहे आणि जे दिसत नाही, त्या भगवंताला आपले मानायचे आहे तसेच त्याचे स्मरण करायचे आहे. ॥ ९१५ ॥

मिळालेल्या संसाराचा दुरुपयोग करू नका, जाणलेल्या

तत्त्वाचा अनादर करू नका आणि मानलेल्या परमात्म्यात संदेह करू नका. ॥ ९१६ ॥

आपल्या अंत:करणात जडतेचा (शरीर-संसाराचा) जितका आदर झाला आहे, तितका परमात्म्याचा अनादर झाला आहे आणि तोच अनादर आपले पतन करील, आपली अधोगती करील. ॥ ९१७ ॥

नाशवान् पदार्थांची महत्त्वबुद्धी मनुष्याची अवनती करते आणि परमात्म्याची महत्त्वबुद्धी-त्याची उन्नती करते. ॥ ९१८ ॥

जो ज्या वस्तू, व्यक्ती इत्यादीचा दुरुपयोग करतो, त्याला त्यापासून वंचित होण्याचे दु:ख भोगावेच लागते. ॥ ९१९ ॥

जे आपले आहे ते नेहमीसाठीच आपले आहे आणि जे कोणत्याही काळी आपले नाही, ते कधीही आपले होऊ शकत नाही. ॥ ९२० ॥

जो सर्वांचा असतो. तोच आपला असतो. जो कधी कोणाचा नसतो, तो आपला होऊच शकत नाही. ॥ ९२१ ॥

साधकाचे ज्या कोणत्या वस्तू, व्यक्ती इत्यादीत आकर्षण असते, त्यात त्याने भगवंताचेच चिंतन करावे. ॥ ९२२ ॥

सर्वठिकाणी समरूप परमात्म्याला पाहणे समदृष्टी आहे आणि प्रकृती तसेच तिच्या कार्याला (शरीर-संसाराला) पाहणे विषमदृष्टी आहे. ॥ ९२३ ॥

मनुष्याने आपला संकल्प ठेवू नये, तर भगवंताच्या संकल्पात आपला संकल्प मिसळून टाकावा अर्थात् भगवंताच्या विधानात परम प्रसन्न राहवे. ॥ ९२४ ॥

नेहमी ही सावधागिरी ठेवली पाहिजे की, माझ्याकडून कोणाला कष्ट तर पोहचत नाही, कोणाची काही हानी तर होत नाही? ॥ ९२५ ॥

हा नियम घ्यावा की, कोणी आपल्या मनानुसार इच्छापूर्ती केली नाही तरी आम्ही नाराज होणार नाही. ॥ ९२६ ॥

संसाराचा मालक परमात्मा आहे आणि शरीराचा मालक मी आहे—असे मानणे चूक आहे. जो संसाराचा मालक आहे तोच शरीराचाही मालक आहे. ॥ ९२७ ॥

जसे बालक प्रत्येक अवस्थेत मातेलाच पुकारतो, तसेच प्रत्येक अवस्थेत भगवंतालाच पुकारा. ॥ ९२८ ॥

न्यायपूर्वक काम करणाऱ्याच्या चित्तात शांती आणि अन्यायपूर्वक काम करणाऱ्याच्या चित्तात अशांती राहते. ॥ ९२९ ॥

ज्यामुळे आपले आणि दुसऱ्यांचे, वर्तमानात आणि परिणामी अहित होत असेल, ते सर्व असत्-कर्म आहे. ॥ ९३० ॥

संसारात जी वस्तू तुमच्या हक्काची (अधिकाराची) असून प्राप्त आहे, तीसुद्धा सदा तुमच्याबरोबर राहणार नाही, मग जी वस्तू बिना हक्काची आणि अप्राप्त आहे, तिची आशा करण्यात काय लाभ? ॥ ९३१ ॥

जर जाणायचेच असेल तर अविनाशीला जाणा, विनाशीला जाणल्याने काय लाभ? ॥ ९३२ ॥

विचार करा की, ज्यात आपले हित आहे आणि जे आपण करू शकतो, ते आपण करतो काय? ॥ ९३३ ॥

जाणाऱ्याला जाणारा समजणे आणि राहणाऱ्याला राहणारा समजणे—हीच यथार्थ समज आहे. ॥ ९३४ ॥

ज्याला पुन्हा सुलटे करू शकत नाही, असे उलटे काम कधी करू नये. ॥ ९३५ ॥

प्रत्येक परिस्थिती भगवंताची लीला (खेळ) आहे, त्याला पुन्हा पुन्हा पाहून आनंदित होत रहा! ॥ ९३६ ॥

द्वैत आणि अद्वैत केवळ मान्यता आहे. तत्त्वात द्वैतही नाही आणि अद्वैतही नाही. ॥ ९३७ ॥

जर आपण कोणता अपराध केला नाही, आपले कृत्य योग्य आहे, तर मग भीती राहू नये, जर भीती वाटत असेल तर कुठे-ना-कुठे काही-ना-काही आपली चूक आहे अथवा आपल्या निर्दोषतेवर आपला दृढ़ विश्वास नाही. ॥ ९३८ ॥

प्रत्येक कार्य करताना आरंभी हा विचार करावा की, आपण हे कार्य का करत आहोत? ॥ ९३९ ॥

योग्य-अयोग्य आपल्या दृष्टीत असते. भगवंताच्या दृष्टीत सर्वकाही योग्य-च-योग्य होते, अयोग्य होतच नाही. ॥ ९४० ॥

दुसरे आमच्यात गुण पाहतात तर ती त्यांची सज्जनता आणि उदारता आहे परंतु गुणांना आपले मानणे त्यांच्या सज्जनतेचा आणि उदारतेचा दुरुपयोग आहे. ॥ ९४१ ॥

विद्या प्राप्त करण्याचा सर्वात उत्तम उपाय आहे—गुरूंची आज्ञा पालन करणे, त्यांची प्रसन्नता प्राप्त करणे. त्यांच्या प्रसन्नतेने जी विद्या प्राप्त होते, ती आपल्या प्रयत्नाने प्राप्त होत नाही. ॥ ९४२ ॥

भगवंताला पुकारण्याने जे काम होत, ते विवेक-विचाराने होत नाही. ॥ ९४३ ॥

भगवंताच्या अप्राप्तीचे दुःख हजारो सांसारिक सुखापेक्षा श्रेष्ठ आहे. ॥ ९४४ ॥

जसे वैद्य जे औषध देतो त्यातच आपले हित आहे, तसेच भगवान् जे विधान करतात, त्यातच आपले परमहित आहे. ॥ ९४५ ॥

जसे गायीच्या शरीरात राहणारे तूप कामी येत नाही, तसेच शिकलेले ज्ञान कामी येत नाही. ॥ ९४६ ॥

'मी ज्ञानी आहे' आणि 'मी अज्ञानी आहे'—ह्या दोन्हीही

मान्यता अज्ञान्यांच्या आहेत. ॥ ९४७ ॥

चारित्र्याचे सौंदर्य ही खरी सुंदरता आहे. ॥ ९४८ ॥

स्मरण करायचे असेल तर भगवंताचे स्मरण करा, काम करायचे असेल तर सेवा करा. ॥ ९४९ ॥

सत्य गोष्ट स्वीकार करणे मनुष्याचा धर्म आहे. ॥ ९५० ॥

एका-एका व्यक्तीची सुधारणा झाली तर समाज सुधारेल. ॥ ९५१ ॥

जर आपल्या सन्तानापासून सुख इच्छित असाल तर आपल्या माता-पित्यांना सुख द्या त्यांची सेवा करा. ॥ ९५२ ॥

कोणाच्या अहिताचीभावना करणे आपल्या अहिताला निमंत्रण देणे आहे. ॥ ९५३ ॥

लक्षात ठेवा! भगवंताचे प्रत्येक विधान परम हितासाठीच आहे. ॥ ९५४ ॥

कोण्यातरी गोष्टीला अनुसरून आपल्यात आपली काहीतरी विशेषता दिसत असेल तर ही वास्तविक पराधीनता आहे. ॥ ९५५ ॥

शेवटी एकट्यालाच जावे लागेल म्हणून अगोदरपासूनच एकटे व्हावे अर्थात् वस्तू, व्यक्ती आणि क्रियेपासून असंग व्हावे, त्यांचा आश्रय घेऊ नये. ॥ ९५६ ॥

सर्वांसाठी ग्रहण करण्यायोग्य नियम आहे— भगवंताचे स्मरण करणे आणि सर्वांसाठी त्याग करण्यायोग्य नियम आहे— कामनेचा त्याग करणे. ॥ ९५७ ॥

'संतोष' समाज-सुधारण्याचा मूल मंत्र आहे. ॥ ९५८ ॥

एकतेत अनेकता आणि अनेकते एकता हिन्दूधर्माची विशेषता आहे. ॥ ९५९ ॥

असत्याचा आश्रय घेणारी व्यक्ती आमचे नुकसान करू शकत नाही. ॥ ९६० ॥

संसारात भगवद्भक्तीसारखी मूल्यवान कोणतीही वस्तू नाही. ॥ ९६१ ॥

परिस्थिती बदलण्याचा प्रयत्न निष्फल होतो आणि त्याच्या सदुपयोगाचा प्रयत्न सफल होतो. ॥ ९६२ ॥

मनुष्य जितकी अधिक आवश्यकता निर्माण करतो, तितकाच तो अधिक पराधीन होतो. ॥ ९६३ ॥

ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे की, परमात्म्याने दिलेली वस्तू चांगली वाटते परंतु परमात्मा चांगले वाटत नाहीत! ॥ ९६४ ॥

लोक आपणाला चांगले मानोत अथवा न मानोत, चांगले जाणोत अथवा न जाणोत, चांगले म्हणोत अथवा न म्हणोत. परंतु आपला भाव जर चांगला असेल तर आपल्या चित्तात नेहमी प्रसन्नता राहील आणि मृत्युनंतर सद्गती होईल. ॥ ९६५ ॥

जर कोणते वाईट चिंतन आले तर सावध व्हावे की, अशावेळी जर मृत्यु झाला तर काय गती होईल? जर नेहमी प्रभूचे स्मरण होत राहीले स्मरण होत राहीले तर मृत्यू केव्हाही आला तरी काहीही चिंता नाही. ॥ ९६६ ॥

व्यक्तिगत जीवन बिघडल्याने संपूर्ण समाज बिघडतो आणि व्यक्तिगत जीवन सुधरण्याने संपूर्ण समाज सुधरतो. कारण व्यक्तींपासूनच समाज बनतो. ॥ ९६७ ॥

भगवंताच्या वियोगापासून होणारे दुःख (विरह) सांसारिक सुखापेक्षाही खूप अधिक आनंद देणारे असते. ॥ ९६८ ॥

ज्याला भगवान् शास्त्र, गुरूजन आणि जगत् यांची भीती वाटते, तो वास्तविक निर्भय होतो. ॥ ९६९ ॥

आपल्यापासून तोच वेगळा होईल जो नेहमीसाठीच वेगळा

आहे आणि प्राप्त तेच होईल जो नेहमीसाठी प्राप्त झालेला आहे. ॥ ९७० ॥

दुसऱ्याच्या प्रसन्नतेने मिळालेली वस्तू दुधासारखी आहे, मागून घेतलेली वस्तू पाण्यासारखी आहे आणि दुसऱ्याचे अंत:करण दुखवून घेतलेली वस्तू रक्तासारखी आहे. ॥ ९७१ ॥

चूक झाल्या बद्दलची चिंता व पश्चात्ताप न करता पुढच्यासाठी सावध व्हावे, ज्यामुळे पुन्हा तशी चूक न व्हावी. ॥ ९७२ ॥

नाहीशी होणारी वस्तू एक क्षण सुद्धा टिकणारी नसते. ॥ ९७३ ॥

आपल्यात विशेषता केवळ व्यक्तित्वाच्या अभिमानाने दिसते. ॥ ९७४ ॥

वस्तूविनाही आपण राहू शकतो. ज्यांच्याविना आपण राहू शकतो त्यांचे दास का व्हावे? ॥ ९७५ ॥

शरीर जवळ दिसते आणि परमात्मा दूर दिसतात— हेच अज्ञान आहे. कारण शरीर नित्य अप्राप्त आहे आणि परमात्मा नित्य प्राप्त आहेत. शरीराशी आपला एक क्षण सुद्धा संयोग होत नाही आणि परमात्म्याशी आपला एक क्षण सुद्धा वियोग होत नाही. ॥ ९७६ ॥

शरीराला संसारापासून आणि स्वयला परमात्म्यापासून वेगळे मानणे चूक आहे. ॥ ९७७ ॥

खऱ्या धर्मात्मा मनुष्याला कोणाचीही गरज नसते, तर जगतालाच त्याची गरज (आवश्यकता) असते. ॥ ९७८ ॥

जर मनुष्याने आपल्या विवेकाचा अनादर केला तर त्याचा विवेक लुप्त होतो आणि त्याने जर आपल्या विवेकाचा आदर केला तर त्याचा विवेक इतका वृद्धिंगत होतो की, शास्त्र तसेच गुरुविनाही त्याला परमात्म्यापर्यंत पोहचवितो. ॥ ९७९ ॥

जर आपण सर्वांचे म्हणणे मानीत नाही, तर मग जेव्हा दुसरा

कोणी आपले म्हणणे मानत नाही. तेव्हा आपण नाराज होऊ नये. ॥ ९८० ॥

अंत:करणात लोभ नसेल तर आवश्यक वस्तू आपोआप प्राप्त होते. कारण वस्तूचा लोभ हाच वस्तूच्या प्राप्तीत बाधक आहे. ॥ ९८१ ॥

कोणत्याही व्यक्तीचा निरादर करू नये. निरादर केल्याने वास्तविक आपलाच निरादर होतो. कारण सर्व जगत ईश्वर रूप आहे. ॥ ९८२ ॥

भारतात जन्म घेऊनही मनुष्य भगवंतात लागत नाही—ही फार मोठी आश्चर्याची आणि दु:खाची गोष्ट आहे! कारण भारतात जन्म मुक्त होण्यासाठीच होतो. म्हणून देवतासुद्धा भारतात जन्म घेऊ इच्छितात. ॥ ९८३ ॥

धर्माचे मूळ आहे—स्वार्थाचा त्याग आणि दुसऱ्याचे हित. ॥ ९८४ ॥

धर्मानुसार स्वत: आचरण करावे—यासारखा धर्माचा प्रचार कोणताही नाही. ॥ ९८५ ॥

'आर्शीवाद द्या' असे न म्हणता आशीर्वाद प्राप्त करण्याचे पात्र व्हावे. ॥ ९८६ ॥

वर्तमानाचीच सुधारणा करायची आहे. वर्तमानाची सुधारणा झाल्यास भूत आणि भविष्य दोन्ही सुधारतात. ॥ ९८७ ॥

दु:खी व्यक्तीच दुसऱ्यांना दु:ख देतो. पराधीन व्यक्तीच दुसऱ्याला आपल्या अधीन करतो. ॥ ९८८ ॥

अज्ञानी तर होऊन गेलेल्याला स्वप्नाप्रमाणे मानतो, परंतु ज्ञानी (विवेकी) वर्तमानाला स्वप्नाप्रमाणे मानतो. ॥ ९८९ ॥

वस्तूचे महत्त्व नाही तर त्याच्या सदुपयोगाचे महत्त्व आहे. ॥ ९९० ॥

भगवंताच्या आवश्यकतेचा अनुभव करणे हीच प्रार्थना आहे. ॥ ९९१ ॥

असत् वस्तूचा लोभ तर असत् वस्तूच्या प्राप्तीत बाधक आहे.

परंतु सत्‌चा लोभ सत्‌च्या प्राप्तीत साधक आहे. ॥ ९९२ ॥

शरीर-निर्वाह संबंधीच्या प्रत्येक कार्यात ही सावधागिरी बाळगली पाहिजे की, वेळ आणि वस्तू कमीत-कमी खर्च व्हावी. ॥ ९९३ ॥

'पर' ची (प्रकृतीची) अधीनता पराधीनता आहे आणि 'परकीय' ची (भोगांची) अधीनता परम पराधीनता आहे. 'स्व' ची (स्वरूपाची) अधीनता स्वाधीनता आणि 'स्वकीय'ची (परमात्म्याची) अधीनता परम स्वाधीनता आहे. ॥ ९९४ ॥

सिनेमा अथवा टी०वी० पाहण्यापासून चार हानी होतात— (१) चारित्र्यहानी (२) वेळेची हानी (३) नेत्र ज्योतीची हानी आणि (४) धनाची हानी. ॥ ९९५ ॥

काहीतरी करण्याने प्रकृतीत स्थिति होते आणि काही ही न करण्याने परमात्म्यात स्थिती होते. ॥ ९९६ ॥

जसे पाणी स्थिर (शांत) झाल्यास त्यात मिसळलेळी माती आपोआप खाली जमा होते, तसेच वाणी-मन-बुद्धी चुप झाल्यास (शांत, क्रियारहित झाल्यास) सर्व विकार आपोआप शांत होतात. अहम् गळून जातो आणि वास्तविक तत्त्वाचा अनुभव होतो. ॥ ९९७ ॥

जे स्वत: भले नाहीत, ज्यांचा स्वभाव उपकार करण्याचा नाही, त्यांनाच असे दिसते की, आज उपकार करण्याचा काळ नाही ! ॥ ९९८ ॥

जोपर्यंत मनुष्याला दुसऱ्यापेक्षा आपल्यात विशेषता दिसते, तोपर्यंत तो साधक तर होऊ शकतो परंतु सिद्ध होऊ शकत नाही. ॥ ९९९ ॥

परमात्मा 'प्राप्त' आहे आणि संसार 'प्रतीती' आहे. जे प्राप्त होते परंतु दिसत नाही, त्याला 'प्राप्त' म्हणतात आणि जे दिसते परंतु प्राप्त होत नाही त्याला 'प्रतीती' म्हणतात. ॥ १००० ॥

॥ श्रीहरिः ॥

# गीता-दर्पण

( परम श्रद्धेय स्वामी श्रीरामसुखदासजी महाराज )

## मराठी अनुवाद

**श्रीमद्भगवद्गीतेवर अनुभवपूर्ण, गीताप्रेमी साधकांकरिता परम उपादेय, नवीन सरळ शोध ग्रन्थ.**

ज्याप्रमाणे भगवंत सम्पूर्ण प्राण्यांचे सुहृद आहेत (५। २९) त्याप्रमाणे त्यांची वाणी श्रीमद्भगवद्गीता सुद्धा प्राणिमात्राची सुहृद आहे. सर्वतोभद्र गीता भगवंताच्या नामाप्रमाणे कोणत्याही रितीने केलेल्या अनुष्ठानाने कल्याणच करते. म्हणून गीतेचे मनन धर्माच्या दृष्टीने, वर्णाश्रमाच्या दृष्टीने, सृष्टीरचनेच्या दृष्टीने, साधनेच्या दृष्टीने, सिद्ध पुरुषांच्या दृष्टीने, छन्द, व्याकरण, साहित्य इत्यादी दृष्टीने विचार केला आहे. प्रत्येक विचाराच्या पाठीमागे स्वामीजींनी आपल्या अनुभवाप्रमाणे गीतेचेच प्रमाणपुट देऊन साधनांची खोज केली आहे.

ह्या गीता-दर्पण ग्रथांच्या माध्यमाने गीतेचे अध्ययन केल्यावर साधकाला गीतेचे मनन करण्याची, तिला समजून घेण्याची एक नवीन दिशा मिळेल, नवीन विधी मिळतील. त्यामूळे साधक स्वत:सुद्धा स्वतंत्ररूपाने गीतेवर विचार करून नवनवीन विलक्षण भाव प्राप्त करू शकेल. परमानन्द सागरात डुबक्या मारल्याने ह्या एवढ्या लहान ग्रंथात भगवंतांनी किती विलक्षण भाव भरले आहेत अशी त्याची गीतेच्या वक्त्याविषयी विशेष श्रद्धा जागृत होईल. असा श्रद्धा भाव जागृत झाल्यास केवळ गीता! गीता!! असे उच्चारण करण्याने त्याचे कल्याण होऊन जाईल.

